वत्सला साहित्य प्रकाशन : पुष्प ४ थे.

# जुईच्या कळ्या

( कथासंग्रह )

: लेखिका :

सौ. आनन्दीबाई शिर्के.

( 'कथाकुंज' व 'कुंजविकास' या कथासंग्रहांच्या लेखिका )

प्रथमावृत्ति ] किंमत १ रुपाया [ नोव्हेंबर १९३९

# प्रकाशकाचें निवेदन



वत्सला साहित्य मालेचें चवथें पुस्तक म्हणून सुप्रसिद्ध लघुकथालेखिका **सौ. आनंदीबाई शिर्के** यांचा हा कथासंग्रह भाऊबीजेच्या सुमुहूर्तावर आम्ही वाचकांस सादर करीत आहोंत.

**सौ. शिर्के** यांच्या प्रसिद्ध झालेल्या अनेक कथा वाचकांच्या वाचनांत आहेतच. '**कथाकुंज**' व '**कुंजविकास**' हीं त्यांचीं दोन पुस्तकें बृहन्महाराष्ट्रांत किती लोकप्रिय झालीं हें पुनरपि सांगण्याचें प्रयोजनच नाहीं. सदर संग्रह तद्वतच अनेक दृष्टींनीं वाचकांना आवडेल व वाचकांकडून आणि मराठी वाङ्मयाच्या अभिमान्यांकडून त्याचें यथायोग्य स्वागत होईल अशी आशा आहे.

आमच्या विनंतीस मान देऊन सदर संग्रह प्रकाशनार्थ आम्हांस दिल्याबद्दल **सौ. शिर्के** यांचें आम्ही अत्यंत आभारी आहोंत. तसेंच मुखपृष्ठासाठीं उत्तम आणि आकर्षक चित्र काढून दिल्याबद्दल लेखिकेचे चिरंजीव **श्री. सुरेंद्रराव शिर्के** यांचे आणि अल्पावधींत उत्कृष्ट छपाई करून दिल्याबद्दल हनुमान छापखान्याचे व्यवस्थापक **मे. नारायणराव कोंकाटे** यांचेही आभार मानणें आम्ही आमचें कर्तव्य समजतों.

पुस्तक अत्यंत अल्पावधींत छापल्यामुळें कांहीं चुका राहून गेल्या असल्यास वाचकांनीं क्षमा करावी.

पुस्तक प्रकाशनाच्या कार्यांत आमच्या अनेक मित्रमंडळींनीं वेळोवेळीं मदत करून आमचेवर उपकारांचें ऋण लादलें आहे. हें ऋण असेंच शुक्लेंदुवत् वाढो हीच इच्छा !

पुणें शहर.<br>
धन त्रयोदशी<br>
८ नोव्हेंबर १९३९

आपला नम्र

**जयवन्त जगताप.**

# कळ्यांचा क्रम



[ ' अलौकिक आत्मदमन ' ही कथा एका इंग्रजी कथेच्या आधारें लिहिली आहे. ' दैवाचा खेळ ', ' हेमाची निवड ' आणि ' वादळी पातळ ' या कथांचीं भाषांतरें गुजरातींत झालीं आहेत. ]

# जुईच्या कळ्या

## हा अस्पृश्योध्दार ! : : १

अस्पृश्यांबद्दल स्पृश्य हिंदूंच्या मनांत कळकळ उद्भूत होऊन आज बरींच वर्षें झालीं. परंतु अस्पृश्यांची मानवी हक्क मिळविण्याच्या बाबतींतील प्रगति कांसवाच्या गतीनें होत आहे असेंहि म्हणवत नाहीं. नुकतेंच महात्मा गांधींचें प्राणांतिक उपोषण यशस्वी झालें व सर्व स्पृश्य जनता अस्पृश्यांविषयींचीं आपलीं कर्तव्यें करण्यास खडबडून जागी झाली. या खळबळीची लाट आमच्या प्रांतीं येऊन आमचीं हृदयें अस्पृश्यांबद्दलच्या सहानुभूतीनें आर्द्र होणें अपरिहार्य होतें.

आमच्या शेजारच्या एका गांवांतील कांहीं लोकांनीं अस्पृश्यांना कांहीं मानवी हक्क देऊन त्यांच्याबद्दलचें प्रेम व्यक्त करण्याचें ठरविलें. या कामीं सर्व गांवकऱ्यांचें सहाय्य मिळावें म्हणून एक व्याख्यानमालेचा कार्यक्रम मुक्रर करण्यांत आला. माझ्या सार्वजनिक कामाच्या टिमकीचा आवाज या गांवा-

पर्यंत येऊन पोंचलाच होता. अर्थात् सदरहू मालेंत मीहि एक पुष्प गुंफावें अशी मला आग्रहाची विनंति करण्यांत आली. लोकप्रिय होण्याची एवढी अमूल्य संधि आयती चालून आली असतां ती गमावण्याचा मूर्खपणा कोणता सूज्ञ करील ? मी तें निमंत्रण अगत्यानें स्वीकारलें. माझ्यासारख्या परगांवच्या व्याख्यात्याकरितां करावयाचे सर्व सोपस्कार स्वागतमंडळानें केलेच. परंतु माझ्याविषयींच्या आस्थेनें प्रेरित होऊन अस्पृश्य बांधवांनीं गाडीच्या घोडयांना दूर सारून स्वतः आपणच मला व्याख्यानमंडपाकडे वाहून नेलें. या वेळीं स्वतःच्या श्रेष्ठतेची जाणीव होऊन मला किती धन्यता वाटली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी.

मी व्याख्यान अगदीं अंतःकरणाच्या कळकळीनें दिलें. अस्पृश्य बांधवांनीं काय केलें असतां त्यांची सुधारणा झपाटयानें होईल याविषयीं मी त्यांना कित्येक मुद्दे सांगितले. त्यांत सर्व सुधारणेचा मूळ पाया जें शिक्षण तें त्यांनीं आधीं घ्यावें या मुद्यावर विशेष भर दिला होता. शिक्षणासंबंधीं बोलतांना साहजिकच मला नुकत्याच मिळालेल्या एका पत्राची आठवण झाली. मी माझ्या वक्तृत्वाचा लाभ देणार हें निश्चित झाल्यावर एका अज्ञात व्यक्तीकडून हें खासगी विनंतीवजापत्र मला आलें होतें. त्यांत त्या गांवची शिक्षणविषयक परिस्थिति निराशाजनक असल्यामुळें मी माझ्या वजनाचा व ज्ञानाचा उपयोग करून ती सुधारेल असें करावें असें सुचविलें होतें. ती गोष्ट आठवून मी अस्पृश्यांना उपदेश केला—

" तुम्ही स्वतंत्र शाळा मागतां असें ऐकिवांत येतें. परंतु अशानें तुमची सुधारणा होणार नाहीं. तुमचींच मुलें आणि तुमचेच शिक्षक असल्यावर अनंत काळापासून रूढ झालेल्या अनिष्ट चालीरीतींत इष्ट त्या सुधारणा होण्यास अवसर कोठून रहाणार ? तुम्हांला तुमची सुधारणा करणें असेल तर स्वतंत्र शाळेचा हट्ट सोडून तुम्ही स्पृश्यांच्या शाळेंतच आपलीं मुलें पाठविलीं पाहिजेत. असें केल्यानें स्वच्छता, नियमितपणा इत्यादि चांगल्या चालीरीति लागून तुमची सुधारणा लवकर होईल. तुम्हांला स्पृश्यांच्या शाळांतून घेण्या-

बद्दलचा निर्बंध आतां सरकारनेंच दूर केला आहे. शिवाय शिक्षणखातें आतां जनतेकडे आलें आहे. तेव्हां त्याचा फायदा अवश्य घेतला पाहिजे. बापहो, आणि बायांनो ! ‘ जो आपुलें हित न करी । तो आपला आपण वैरी ’ हें लक्षांत ठेवा. आणि आपल्या मुलांना शिक्षण द्या. शिक्षण हा सुधारणेचा पाया आहे. त्याशिवाय कुणालाहि तरणोपाय नाहीं. ”

याशिवाय मृतमांस खाऊं नये, घाणेरडें राहूं नये, स्वाभिमान धरावा वगैरे वगैरे पुष्कळ गोष्टी मी सांगितल्या. स्पृश्यांनाहि सांगितलें—

“ तुम्ही अस्पृश्यांना समतेनें वागवा. त्यांना शिक्षण द्या. पाण्याशिवाय त्यांचे हाल करूं नका. माणुसकीनें वागा. अस्पृश्यता हा हिंदु धर्माला कलंक आहे. अस्पृश्यता नष्ट करून तो धुवून काढा. सात कोटी माणसांना पशूपेक्षांहि हलकें लेखून पददलित करूं नका. अशानें हिंदुधर्म नामशेष होईल. पहा. तुमच्या स्वयंपाकघरांत क्षुद्र मांजर जाऊं शकतें. तें तुमच्या फडताळांतलें दूध पिऊं शकतें आणि तें दूध तुमच्या चहाला चालतें. कुत्रा तुमच्या बैठकीवर, अंगावर वावरूं शकतो. आणि या मानवी प्राण्यांची तुम्ही सांवली घेऊं शकत नाहीं. पशूंपेक्षांहि तुम्ही त्यांना हीन लेखतां. हें योग्य आहे काय ? ”

थोडक्यांत सांगायचें म्हणजे कोणतेंहि वर्तमानपत्र चाळून पाहिलें असतां या विषयासंबंधीं जें जें लिहिलेलें सांपडेल त्या सर्वांचा मतितार्थ व्याख्यानांत होता. व्याख्यान फारच परिणामकारक झालें. स्पृश्यास्पृश्य बांधवभगिनींनीं मंडप चिकार भरला होता; व मधून मधून जोराच्या टाळ्या वाजवून ते माझा उत्साह वृद्धिंगत करीत होते. माझ्या उत्तेजक व्याख्यानाचा परिणाम म्हणजे एका गृहस्थांनीं उठून ‘ आमच्या विठोबाच्या देवळाच्या दारांतून अस्पृश्यांनीं दर्शन घेतल्यास आपली कांहींच हरकत नाहीं ’ असें जाहीर केलें. त्यामुळें स्फूर्ति येऊनच कीं काय एका गुजर धनाढ्यानें आपली विहीर अस्पृश्यांना मोकळी असल्याचें सांगितलें ! व मंडप कोसळून पडतो कीं काय असें वाटण्याइतका टाळ्यांचा व धनाढ्याच्या जयजयकाराचा प्रचंड कडकडाट झाला ! ती विहीर याच वेळीं माझ्या हातून खुली व्हावी अशी सूचना आली

व ती बहुमतानें मान्य झाली. लगेच कांहीं प्रमुख मंडळींसह आम्ही विहिरी-कडे गेलों व मामुली वहिवाटीप्रमाणें आभार मानून ती विहीर अस्पृश्यांना आजपासून खुली आहे असें मी जाहीर केलें. या पवित्र विहीरीचें तीर्थ घेऊन सर्वांनीं पावन व्हावें अशी एक सूचना अस्पृश्यांच्या घोळक्याच्या दिशेकडून आली व टाळ्यांच्या गजरानें ती पास झाली. परंतु पाणी काढायला दोरच मिळेना. इतक्यांत एक बेडर तरुण हरिजन पुढें आला व आपलें मुंडासें सोडून त्यानें पोहऱ्याला बांधलें. त्या बांधवानें प्रथम तें तीर्थ माझ्यापुढें ठेविलें. त्यांतून मी एक आचमन घेतांच बाकीचें तीर्थ सर्व हरिजनांनीं भक्तिभावानें घेतलें. हें पाहून माझें हृदय पुलकित झालें.

— २ —

" जोहार मायबाप जोहार. "

रात्रौ मला दिलेल्या निवासस्थानीं मी एकटाच बसलों असतांना ३।४ इसम दाराशीं येऊन हात जोडून लवून म्हणाले. त्यांच्या नमस्काराच्या पद्धती-वरूनच ते कोण असावेत हें माझ्या ध्यानीं आलें. हातांतील पुस्तक दूर सारून मी म्हणालों,

" नमस्कार, या, आंत या. काय काम आहे आपलं ? "

" नाहीं. बरें आहोंत इथंच मायबाप. आपल्याशीं थोडं बोलायचं होतं. "

" हरकत नाहीं. या ना आंतच ? "

मोठ्या संकोचानें ते आंत आले. पण उंबरठ्याजवळ जमिनीवरच बसले. बोलायचीं व आचरायचीं मतें निरनिराळीं असतात असा निष्कारण माझ्या-विषयीं त्यांचा गैरसमज होऊं नये म्हणून मीहि बैठकीवरून खालीं उतरून त्यांच्याजवळ बसूं लागलों. तेव्हां त्यांना फारच संकोच वाटून ते जरा बैठ-कीच्या कडेजवळ बसले, व मी हांतरीवर बसून आमचें संभाषण सुरू झालें.

" कां येणं केलंत ? कांहीं काम ? "

सद्गदित होऊन हात जोडून त्यांच्यापैकीं एक तरतरीत इसम म्हणाला,

" फार दयाळू मायबाप आपुन. आपल्याशिवाय आमची दाद कोण घेईल ? "

" सांगाना काय म्हणणं आहे तुमचं ? "

" आपुन सांगितलं, शिक्षणाशिवाय तरणोपाय नाहीं तुम्हांला– "

" हो खरं आहे तें. "

" तुमचं तुम्ही हित करा– "

" अगदीं खरं. "

" पण साहेब ! कसं करावं आम्ही ? "

" मी सांगितलंच आहे शिकल्या–"

मला मध्येंच थांबवून तो म्हणाला,

" आपल्याला एक बिगर सहीचं पत्र मिळालं असेलच. "

" हो हो मिळालं. "

" साहेब तें मी लिहिलं होतं. "

" असं का ? पण त्यांत विशेष कांहीं नव्हतं. "

" आपल्या ध्यानांत नाहीं यायचं. मीच सांगतों. "

त्याचे ते शुद्ध उच्चार ऐकून माझें कुतूहल जागृत झालें. मी आश्चर्यानें व आश्वासनपूर्वक दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागलों. त्याच्याबरोबर आलेलीं माणसें म्हणालीं,

" हां हां. सायबास्नी समदं नीट सांगा. त्येच काय तरी उपाय करत्याल."

" साहेब, या गांवांत आमच्या लोकांचीं पांच पंचवीस घरं आहेत, अन् सारा गांव पांढरपेशांचा आहे. आम्हांला शेत ना भात. शिवच्या कुत्र्यावाणी आमचं लोक गांवाबाहेर रहातात. अन् कुत्र्याचं जिणं जगतात. कुत्रं तरी पाणवठ्याला पाणी पितं. पण आम्हांला तेंय नाहीं. आम्हीं गांवच्या सफाईचीं कामं करायचीं, अन् गांवांतल्या लोकांचे उष्टे तुकडे खाऊन जगायचं. आमच्या मनगटांत बळ आहे. काम करून भाकरी मिळवायची इच्छा आहे. पण आम्हांला काम कोण देणार ? आमच्या हातचं काम कोणाला चालेल ? आम्ही

मेलेलं ढोर ओढावं, घाण नाहींशी करून लोकांचं आरोग्य राखावं, अन् त्याबद्दल मोबदला काय ? तर तेंच मांस तुम्ही खा. " मेलेल्या ढोरांचं मांस खातां म्हणून तुम्हांला ओंगळ समजतों " असं बोलायचं, अन् मजुरी द्यावी लागेल म्हणून तेंच खायची सक्ति करायची ! साहेब, आपण म्हणाल लोक सांगतात पण तुम्ही कां खातां ? पण पोटाची आग मोठी वाईट आहे. भुकेच्या पोटीं काय जाणार नाहीं ? टोळधाडीनं दुष्काळ पडल्यावर तेच खाऊन पोटाची आग माणसांनीं शमवली नाहीं कां ? वेढ्यांत सापडलेल्या मराठा पलटणीनं शाहूमहाराजांच्या आज्ञेनं घोड्याचं कच्चं मांस खाऊन जीव जगवले नाहींत कां ? साहेब, सबसे प्यारा जीव. तो आम्ही अशा जिण्यानं जगवतो. काम काय तें पावसाळ्यांत नांगराय भांगलायचं भिळायचं. किंवा लाकडं फोडायचं, गुरं राखायचं कधीं मधीं. आमचं शेंद-लेलं पाणी चालायचं नाहीं. सडलेले तांदूळ चालायचे नाहींत. आम्हीं केलेला भाजीपाला चालायचा नाहीं. गडी म्हणून कोणी ठेवायचं नाहीं. फक्त कोंबडीं बाळगून मुसलमान वस्तींत किंवा साहेबांचा बंगला असला तर तिथं अंडीं विकावीं. पण ते साधनय् इथं नाहीं. अशा जिण्यांत जगत असतां मुलालेक-रांना तरी चार अक्षरं शिकवून शहाणं करावं म्हणून खटपट करून इथं एक शाळा मागितली अन् ती मिळाली. पण एक मास्तर आमचांच शिकवतो तीन यत्ता पावतर. साहेब, आम्ही पण माणसंच. आम्हांला घडण्यांत देवानं कसुराई केली नाहीं. डोकं मेंदू सगळं दिलंय आम्हांला. आमची पांच पोरं तीन यत्ता शिकलीं. पुढं शिकायला जागा नाहीं— "

" कां बरं ! इथं तर सातवीपर्यंत वर्ग आहेत. "

" आहेत, पण त्या शाळेंत आमचीं मुलं घेत नाहींत. "

" कां घेत नाहींत ! घेतलींच पाहिजेत. घ्यावीं असं सर्क्युलरच आहे मुळीं. तुम्हीं तक्रार कां केली नाहीं ! "

" तेंच सांगतों साहेब; जरा ऐकून घ्या गरीबाचं. आधीं इथल्या मंड-ळींनीं तक्रार केली नाहीं. इथून तीन कोस गांव आहे. तालुक्याच्या त्या

गांवच्या शाळेंत मुलं दाखल केलीं. सरकार ! उष्टे शिळे तुकडे खाऊन अर्ध-पोटीं पोरं तीन कोस जमीन तुडवीत तिथवर दररोज जायाचीं बरं. तिथंय हिडीस फिडीस झालं. पण सरकारी कचेऱ्या तिथं असल्यामुळं मज्जाव झाला नाहीं. पुढं हें सारं मी इथं आल्यावर मला कळलं तेव्हां योग्य अधिकाऱ्यां-कडे दाद मागितली. अन् फार चौकशी होऊन " मुलं याच शाळेंत घ्यावीं असं लिहून आलं. पण गांव कांहीं दाद देईना. सरकारकडं धांव घेतली तेव्हां सरकारनं सर्क्युलर काढलं कीं – " जर अस्पृश्यांचीं मुलं शाळेंत घेतलीं नाहींत तर शाळेची ग्रॅन्ट बंद करूं. "

झालं, अधिकारी आले. मेंबर आले, चौकशा झाल्या.

" अस्पृश्यांचीं मुलं शाळेंत घेतलीं नाहीं तर ग्रॅन्ट बंद होईल, तुमचीं मुलं शिक्षणाला आंचवतील " असं साऱ्या गांवाला, पंचांना समजावून सांगितलं, तेव्हां गांवलोक म्हणाले,

" शाळा चावडींत भरते, तिथं मारुतीचं देऊळ आहे. अन् दुसरी रामाच्या देवळाला लागून भरते. "

" साहेब, ती मारुतीची मूर्ति आमच्यापैकींच एका महारानं घडविलेली आहे असं म्हणतात. अन् राममंदिराचे चिरे घडणं अन् बांधकाम करणं यांत-सुद्धां आमच्या लोकांचा हात होता बरं. "

" अन् त्याच देवाचं दर्शन व्हावो परतं, पर भाइर बसून शिक्शान तरी मिळावं होतं आमच्या पोरास्नी मायबाप ! "

त्याचे जोडीदार हुंदके देत आणि अश्रु पुशीत केविलवाण्या स्वरानें म्हणाले.

" पण अधिकाऱ्यांनीं गांव लोकांची सबब ऐकली नाहीं. "

" सरकारी हुकमाप्रमाणें न वागाल तर तुमचंच नुकसान होईल, ग्रॅन्ट बंद होईल, त्यामुळं शाळाहि बंद होईल; बोर्डाच्या इमारतींत मुलं बसूं दिलींच पाहिजेत – " असं जेव्हां त्यांनीं बजावलं तेव्हां गांवकरी ' बरं ' म्हणाले. '

" ठीक, शेवटीं ' बरं ' म्हणाले ना ? " मी आनंदून प्रश्न केला.

" होय साहेब, पण त्या ' बरं ' म्हणण्यांत फार खोल अर्थ होता हें

लौकरच कळून आलं. अधिकारी गेल्यावर त्यांनीं सगळे महार लोक बोलावले अन् त्यांची चांगली झडती घेतली. ”

“ तुम्हांला उष्टे तुकडे, ताकपाणी, सणवार कांहीं म्हटल्या कांहीं मिळणार नाहीं. तुम्ही फार माजलांत; सरकाराकडे धांव घेतां काय ? तुमच्या पोरांना कशाला पाहिजे शिक्षण ? ”

“ असं म्हणून त्यांनीं आमच्या तीन कोस जमीन तुडवीत जाणाऱ्या पोरांना बेदम मारलं अन् आमच्या लोकांवर कडकडीत बहिष्कार घातला. उष्टे तुकडे मिळत तेहि बंद झाले. उपासमार होऊं लागली. पांच पोरांसाठीं साऱ्या म्हारांची उपासमार होऊं लागली, काम नाहीं, उपजीविकेचं साधन नाहीं. शेवटीं पोटाच्या आगीनं आमचे लोक गांवकऱ्यांना शरण गेले. अन् “ शिक्षण नको पण वतन वाढा ” असं म्हणाले. होय साहेब, शिळे तुकडे, उष्टे तुकडे, हेंच आमचं वडिलार्जित वतन. तें वाढा, आमचीं मुलं नाहीं शाळेंत जायचीं. तीन कोसांवरल्या शाळेंत जातील, असं म्हणाले. गांवकऱ्यांना तेंच पाहिजे होतं. परंतु शाळेचा रिपोर्ट अधिकारी मागवीत. चौकशी चाले. तेव्हां आढळून येई कीं एकहि अस्पृश्य मुलगा गांवच्या शाळेंत नाहीं. तेव्हां मुलं कां नाहींत म्हणून पंचांना व मास्तरांना लिहून विचारलं. तेव्हां दोघांनींहि उत्तर लिहून पाठवलं कीं,

“ आमची कांहीं हरकत नाहीं-पण महार लोकच मुलं पाठवीत नाहींत. ”

पुन्हां अधिकारी आले. पुन्हां चौकशी चालली. तेव्हां गांव लोक व पंच यांच्या समक्ष अस्पृश्यांनीं सांगितलं कीं “ आम्हांला कोणी हरकत करीत नाहीं ! पण आमचीं पोरं दूरदेशीं मजुरी करून पोट भरायला गेलीं. आतां आमचीं शिकणारीं पोरं कोणी नाहींत. ”

“ साहेब, यांचा बोलविता धनी वेगळाच होता हें आपल्या लक्षांत आलंच असेल. अधिकाऱ्यांच्या ध्यानांतहि ती कारवाई आली. तपासाअंतीं ती खरी ठरली. तेव्हां पंचांना लिहून कळवलं कीं, “ तुम्हीं अस्पृश्य मुलांना शाळेंत बसविण्यास प्रतिबंध करतां. कारण अजूनहि तीं मुलं दुसऱ्या गांवीं

चालत शाळेंत जातात. गांवांत शाळा असून तुम्ही त्यांना तीन कोस चालत जाण्यास भाग पाडतां. तरी यापुढें त्यांना तालुक्याच्या गांवीं जाऊं न देतां तुमच्या गांवांतील शाळेतच दाखल करून घ्यावं. असं न कराल तर तुमच्या शाळेंतील वरचे वर्ग बंद करण्यांत येतील ! "

" हं. मग ? " मी उत्सुकतेनें विचारलें.

" मग काय ? दोन चारदां विचारणा न् चौकशा होऊन शेवटीं सरकारी अधिकाऱ्यांनीं स्पृश्य शाळेंतले पांचवीपासून वरचे वर्ग पाहिजे असतील तर ते अस्पृश्यांच्या शाळेंत उघडले जातील असं कळवलं. "

" हं, ही मात्रा मात्र लागू पडली असेल ? " मी आशाळभूतपणें पृच्छा केली.

" छे, इतकं कुठलं आमचं दैव सुधं आहे साहेब ? ते आमच्या लोकांवर खूप रागावले, चिडले अन् आम्हांला दम भरला कीं, " तुम्हीं फार माजलां आहां. अधिकाऱ्यांकडे अर्ज करतां काय ? नाहीं आमच्या मुलांचं शिकणं झालं तरी बेहत्तर. पण तुमच्या पोरांना शिकूं देणार नाहीं ! "

" सांगा साहेब, आम्ही काय करावं ? आमचा जन्म तर असाच गेला. पण आमच्या पोरांनीं पिढ्यान्‌पिढ्या अज्ञानाच्या खाईत असंच खितपत रहावं काय ? साहेब, आम्हाला डॉ. आंबेडकरासारखे पुढारी अन् महात्मा गांधीसारखे कैवारी लाभले आहेत खरे. पण आमचं नष्टचर्य अजून संपलेलं नाहीं. नाहीं तर सरकार अन् अधिकारी यांच्या हुकमाला न जुमानतां या लोकांनीं आमच्यावर एवढा जुलूम केला असता काय ? आमचे दुर्दिन दूर करायला प्रत्यक्ष ईश्वरच अवतारला पाहिजे. गांधी आंबेडकर यांचे प्रयत्न अपुरे पडले साहेब ! दुहेरी उपासमार होते आमची. तेच आमच्यापैकीं कोणी बाटून ख्रिस्ती किंवा मुसलमान झाले तर अन्नवस्त्र मिळून शिवाय यांच्याशीं वरचढपणानं त्यांना वागतां येतं ! अन् स्वधर्मात राहिल्यानं असं दुहेरीं मरण ओढवतं ! किती जन्मांचं पाप हें आमचं ! "

ती करुण कहाणी सद्गदित कंठानें सांगत असतां तो मधून मधून आपले

अश्रु पुशीत होता. त्याचे जोडीदार तर हुंदके देत होते; आणि माझ्या हृदयाचें पाणी पाणी होऊन तें नेत्रद्वारें वाट काढीत होतें. ज्या मख्ख लोकांनीं इतका दुराग्रह धरला ते मला काय दाद देणार याची अटकळ होतीच. परंतु त्याना दोन गोष्टी सांगून पाहण्याचें मी ठरविलें. माझा बेत ऐकून ते म्हणाले,

" सकाळच्यासारखं उपड्या घागरीवर पाणी होईल साहेब. कांहीं उपयोग नाहीं कंठशोष करून. सकाळचंच पहा ना ! विहीर आम्हांला दिली, तिच्यांतून पाणी आम्हीच काढलं, अन् तें पिऊन आम्हीच पावन झालों ! आपल्याशिवाय एका तरी मायेच्या पुतानं हात भिजवायचा होता त्या पाण्यानं ! "

या वस्तुस्थितीचं अंजन पडतांच माझे डोळे विस्तृत झाले, तरी मी गांवकऱ्यांशीं बोलणें केलेंच. परंतु अटकळीप्रमाणेंच अनुभव आला. स्वतःचें नाक कापून दुसऱ्याला अपशकून करणाऱ्या करनकऱ्या बाईप्रमाणें " आमच्या मुलांच्या शिक्षणाचं नुकसान झालं तरी पत्करलं पण आम्ही महारांना नाहीं शिकूं देणार ! " असा स्पष्ट जबाब त्यांनीं दिला. इतकेंच नव्हे तर " गांव आमचा आहे, सन्मानानें बोलावलेल्या पाहुण्यानें उगाच लष्करच्या भाकरी भाजण्याचा उपद्व्याप करूं नये; तें शहाणपणाचें होणार नाहीं. " असा धमकीवजा इषाराहि दिला. येतांना किती आनंदानें मी आलों होतों; पण परत जातांना तो पार मावळला. नैराश्यपूर्ण विचारांच्या भारानें माझें हृदय जड झालें, मस्तक बधिर झालें !

काय तरी लोक हे ! यांनाच कां स्वराज्य पाहिजे ? तें नसतांहि जर हिंदुस्थानांतील लोकसंख्येपैकीं निम्मी संख्या जी स्त्रीजातीची तीवर व राहिलेल्या निम्यांपैकीं सात कोटि अस्पृश्य बांधवांवर अनियंत्रित सत्ता ते चालवीत आहेत; तर तें मिळाल्यावर हे काय करतील कोण जाणें !

—३—

विमनस्कपणें मी त्या अस्पृश्य बांधवांसह स्टेशनच्या रस्त्यानें चाललों होतों. मी अस्पृश्यांची खरीच कड घेत आहे हें स्पष्ट झाल्यामुळें गांवकऱ्यांचा मजविषयींच्या आदराचा ओघ आटला होता. त्यांच्यापैकीं कोणीहि मला पोंचवायला आले नाहींत. स्टेशनजवळ येतांच तो अस्पृश्यांचा मुख्य बांधव म्हणाला, " गाडीला अझून एक घंटा वेळ आहे, तोंपर्यंत ही मुलींची शाळा पाहतां साहेब ? "

शाळा पाहण्याइतका उत्साह मनाला उरला नव्हता. केवळ त्याला बरें वाटावें म्हणून मीं संमति दर्शविली.

शाळेच्या हेडमिस्ट्रेस खिश्चन बाई होत्या. शाळा पाहून मी समाधान व्यक्त व नमूद केलें आणि निरोप घेऊन निघणार इतक्यांत तो गृहस्थ म्हणाला,

" साहेब, या शाळेंतहि अस्पृश्य मुलींना घेत नाहींत. "

मी आश्चर्यानें विचारलें, " कां ? "

निदान खिश्चन बाईनें तरी अस्पृश्यांना आडकाठी करूं नये अशी माझी अपेक्षा होती. मी बाईना प्रश्न केला,

" अस्पृश्य मुलींना या शाळेंत कां घेत नाहीं ? सरकारनें तरी ' घ्यावें ' असें सर्क्युलर काढलें आहे. "

" हो, आमची कांहीं हरकत नाहीं. पण खालीं मालक राहतात ते हिंदु आहेत. खालीं त्यांनीं रहावं आणि वर महार मुलींनीं बसावं हें त्यांना पसंत नाहीं. शिवाय वर यायला जिना त्यांच्या पुढल्या भागांतून आहे. तेव्हां ' महार मुलींना घ्यायचं असेल तर आमची जागा सोडा ' असें म्हणतात. अन् अशी शाळेला सोइस्कर जागा गांवांत दुसरी नाहीं. "

" पण तुम्ही त्याच जिन्यानें येतां ना ? तुम्हांला नाहीं हरकत करीत ? "

माझ्या तोंडून वरील सहजोद्गार ऐकून ती बाई भुंवया चढवून म्हणाली,

" म्हणजे ? मी काय महार आहें वाटतं ? मला कां हरकत करतील ? "

खरेंच, तिला महार म्हणायची किंवा महाराप्रमाणें तिला वागविण्याची

कोणाचीच प्राज्ञा नव्हती. तिच्या प्रश्नानें मी चांगलाच चमकलों; आणि जागेच्या मालकाच्या अजब विचारसरणीचा मनाशीं विचार करीत तेथून निघालों.

जगांतील कोणत्याहि जातींचे आणि धर्मांचे लोक हिंदूंच्या डोक्यावर बसले तरी चालतील. इतकेंच नव्हे तर या बाईप्रमाणें धर्मांतरानें अस्पृश्यता नष्ट करून मग डोक्यावर बसले तरी चालेल. परंतु अस्पृश्य बांधव स्पृश्य हिंदूंच्या माडीवर बसलेला चालणार नाहीं. जणूं काय त्यानें पददलितच असलें पाहिजे.

मी विमनस्कपणें गाडीचें दार उघडूं लागलों, तर 'जागा नाहीं, जागा नाहीं' असें आंतील लोक दाराशीं येऊन ओरडूं लागले. वास्तविक गाडींत जागा पुष्कळ होती. परंतु माझ्यामागून येणाऱ्या लोकांच्या भयानें ते मज्जाव करीत होते. मी दार उघडून मुकाट्यानें आंत शिरलों. माझ्यामागून एक अस्पृश्य जोडपें आपल्या मुलासह आंत शिरलें. त्या क्षणीं आंतील मंडळींनीं बांकावरील रिकाम्या जागा आपल्या सामानानें व्यापून टाकल्या. तें जोडपें बिचारें शौचकुपाच्या दाराजवळ मुकाट्यानें हातपाय आंवरून बसलें. इतक्यांत डब्याच्या टोंकाकडून ध्वनि आला—

" देव गया द्वारका, पीर गया मक्का
ने इंग्रजना राजमां धेड मारे धक्का !

कांहीं धरबंद राहिला नाहीं. कुठंहि जा, यांचा आपला सुळसुळाट. या आगगाड्यांनीं सारा भ्रष्टाकार माजवला आहे जगांत ! दुसऱ्या डब्यांत जायला काय झालं होतं यांना ? "

" तें कांहीं विचारूं नका. फार मातलेत. "

" आम्ही एकीकडे खालीं बसलंया दादा. "

" चूप. "

" अरे भाई, ए कळजुगणां कवतुक है शुणो ! "

मी वळून पाहिलें तों त्या गांवीं अस्पृश्यांना आपली विहीर खुली केल्याचें

जाहीर करणारा तो लठ्ठ धनाढ्य गुजर वरीलप्रमाणें काव्यमय वाक्सुमनें उधळीत होता ! आणि गाडींतील इतर हिंदुधर्माभिमानी त्याला साथ करीत होते. त्या गुजराकडे पाहून मी थक्क झालों. माणसाचें खरें स्वरूप तरी कोणतें समजावें ? इतपत ज्याचे विचार आहेत, त्यानें आपली विहीर खरेंच अस्पृश्यांना दिली, कां दिल्याचें सोंग केलें ? मी सारखा विचार करीत होतों.

इतक्यांत गाडीनें वळण घेतलें व धाडधाड करीत ती एका स्टेशनांत शिरून थांबली. प्लॅटफार्मवर उतारूंची खूपच गर्दी होती. एक मोठा घोळका आमच्या डब्यांत शिरला. संकोचानें बसलेल्या त्या अस्पृश्य जोडप्याला वाट अडवून बसल्याबद्दल प्रत्येकानें यथाशक्ति आहेर केला. गाडींत शिरणाऱ्यांपैकीं सर्वांच्या मागून एक ख्रिश्चन तरुणी डब्यांत शिरली. तिच्या दोन्ही हातांनीं दोन गोजिरवाण्या आंग्ल बालकांचे हात धरलेले होते. त्यांच्यासह आंत शिरतांच तिनें आपल्या चिमुकल्या अरुंद कपाळाला आठ्या घातल्या व डोळे आकुंचित करून ती सभोंवार जागा पाहूं लागली. नंतर डोळे विस्तृत करून व आवाज शक्य तितका बारीक काढून ती म्हणाली, " ए, सामान नीचे रक्खो. ए जगा खालीं बैठने के वास्ते है. सामान रखने के वास्ते नही है. "

बारीक तीक्ष्ण आवाजानें सोडलेल्या फर्मानाबरहुकूम सामान खालीं ठेवून अस्ताव्यस्त बसलेल्या उतारूंनीं नीट बसून तिला प्रशस्त जागा करून दिली. स्थानापन्न होतांच मुलांपैकीं एकानें मान खालीं घालून व शरीर सांवरून शौचकुपापाशीं संकोचानें बसलेल्या त्या अस्पृश्य जोडप्याकडे अंगुलीनिर्देश करून म्हटलें, " आया, सी, दीज पीपल आर ट्रॅव्हलिंग विदाउट टिकेट ! "

आयानें उत्तर केलें, " नो, नो, माय चाइल्ड. दे आर नॉट ट्रॅव्हलिंग विदाउट टिकेट. "

" देन व्हाय आर दे सिटिंग डाऊन ? "

" बिकॉज दे आर डिप्रेस्डक्लास पीपल ! यू सी. "

मी तिच्याकडे पाहिलें. जन्मतः ती किंवा जन्मापूर्वी तिचीं पितरें याच वर्गातील असतील. तथापि तिनें त्या वर्गाविषयीं केलेला सडेतोड खुलासा

ऐकून मी सर्दच झालों. आनुवंशिक अस्पृश्यतेचें जोखड झुगारून दिल्यानें तिच्यांत हा धीटपणा आला होता. आणि तें अभिमानानें आपुलकीनें मानेवर वागविणारांची स्थिति काय होती ? न कळत माझी दृष्टि पुनः त्या तरुणीकडे गेली; नंतर त्या खालीं बसलेल्या जोडप्याकडे गेली. त्या तरुणीचा पोषाख नीटनेटका पांढरा शुभ्र होता, तिच्या पायांत काळेकुळकुळीत उंची बूट होते. ती अभिमानानें ताठ बसली होती आणि त्या जोडप्याच्या अंगावर अस्वच्छ चिंध्या, परंतु त्याही अपुऱ्या होत्या. त्यामुळें उत्पन्न झालेल्या लज्जेनें म्हणा किंवा गुलामगिरीच्या जोखडाचा भार असह्य झाल्यामुळें म्हणा, त्यांच्या माना खालीं वांकल्या होत्या. मूळ एकाच खाणींतील मृत्तिकेचीं दोन चित्रें व त्यांतील अंतर पाहून त्यांच्याविषयीं तुलनात्मक दृष्टीनें विचार करीत मी स्तब्ध बसलों होतों.

शेजारच्या कंपार्टमेंटमध्यें कांहीं मंडळी हिंदूंच्या ऱ्हासाबद्दल जोरानें चर्चा करीत होती. एक तरुण ताजा ज्ञानप्रकाश वाचून आपल्या मित्रांना सांगत होता—

" गेल्या खानेसुमारीवरून हिंदूंच्या लोकसंख्येची वाढ शेंकडा १०.५ झाली. मुसलमानांची शेंकडा १३ झाली व खिस्ती लोकांची शेंकडा ३२.५ या प्रमाणांत झाली. "

" अशी परिस्थिति असल्यावर कां होणार नाहीं ? " मी मनांत म्हटलें.

" अजूनहि हिंदूंचे डोळे उघडत नाहींत. देवा, हा आनुवंशिक अस्पृश्यतेचा कलंक धर्मांतराशिवाय धुवून निघायचाच नाहीं काय ? "

हें कोडें माझ्या डोक्यांत धुमाकूळ घालीत होतें. आणि तें अद्यापिहि सुटलें नाहीं.

# दांपत्य जीवन : : १

पुष्कळ दिवसांची गोष्ट. एका सुसज्जित दिवाणखान्यांत एक तरुणी विविधवृत्ताचा खास अंक वाचण्यांत गढून गेली होती. एखादी हवी असलेली वस्तू सांपडली असतां मनुष्य जसा अधीरतेनें ती हस्तगत करतो त्याप्रमाणें ओळींमागून ओळींवर ती भराभर दृष्टि फिरवीत होती, हें तिच्या मानेला बसणाऱ्या कळे ना कळेशा नाजुक आंदोलनांवरून व्यक्त होत होतें. एखादी रहस्यमय कादंबरी वाचीत असतां वाचक ज्याप्रमाणें पुढें काय असेल हें जाणण्याच्या जिज्ञासेनें भराभर वाचीत जातो व तसें करीत असतांना विषयाच्या विविधतेप्रमाणें त्याच्या मुद्रेवर विविध भावतरंग उमटत असतात त्याप्रमाणें तरुणीच्या तोंडावर मधून मधून विचार–विकारांच्या विविध छटा उमटत होत्या. वाचन–विषयाशीं ती अगदीं तदाकार झाली होती. त्यामुळें पांच मिनिटांपूर्वी तिच्यामागें येऊन राहिलेल्या तिच्या मैत्रिणीची तिला चाहूलसुद्धां जाणवली नाहीं. शेवटीं तिच्या तंद्रीचा भंग तिच्या त्या मैत्रिणीनें केला.

" काय हो सुधाताई, कसली एवढी कादंबरी वाचण्यांत गढलां आहांत? कुणी आल्याची दाद नाहीं अगदीं. बघूं ? "

पुस्तक मिटून घट्ट धरीत सुधा म्हणाली, " कांहीं नाहीं. विविधवृत्ताचा अंक चाळीत होतें. "

" अस्सं. एवढं काय आहे त्यांत ? यजमानांची एखादी गोष्ट का कविता ? का आपलंच आहे कांहीं तरी लिखाण ?

" छे ! मी कुठं आहे एवढी विदुषी ! "

तिच्या हातांतून अंक ओढून घेऊन तो चाळीत मैत्रीण म्हणाली,

" मग एवढी कशावर दृष्टि खिळली होती ? "

' घटस्फोटाच्या कायद्याची जरूरी आहे काय ? '

हं. आपण दिलंय वाटतं मत ठोकून यावर ?

सुधा मान उडवून म्हणाली.

" भलतंच. आम्हीं आपले निव्वळ वाचक. आम्हांला काय कळतं त्यांत ? "

" ऐकेल कोणी तरी ! एवढ्या बड्या लेखकाची बायको तूं अन्–"

' पुरे ग. किती टवाळी करशील कुंदे ! दे, जरा बघूं दे. "

" बघना. "

पानें उलटीत कुंदा म्हणाली.

" हें बघ, ह्या कोण ? सौ, सीताबाई भांडारकर. हं, काय म्हणतात ? [ वाचते ] ' घटस्फोटाचा कायदा अमलांत आणायला आम्हीं मदत केली पाहिजे. मात्र ह्या कायद्याचें पहिलें पाऊल जपून पडावें याकरितां तज्ज्ञांकडून त्याची योग्य चर्चा व्हावी. "

"हं. घटस्फोटाला या अनुकूल आहेत. पण तज्ज्ञ कोण ? ज्यांनीं घटस्फोट करून घेतले आहेत ते कीं करूं इच्छितात ते ? अं "

" पुरे ग तुझी चर्चा. पुढचं वाच. "

" पुढचं काय ? न वाचतांच नुसत्या नांवावरून मी सांगतें तुला साऱ्यांचीं मतं ! "

" मोठी ज्योतिषीच कीं नाहीं ! कांहीं नको सांगायला. राहूं दे. "

" ऐक तरी, हं हे कोण ? वैद्य का ? विरुद्ध. घे टिपून. ह्या कोण ? सौ. केळकर ? विरुद्ध. पहा हवं तर. कामत ? अनुकूल. ना. खापर्डे ? सांगवत नाहीं. [ वाचते ] काय बरं ? विरुद्धच. हं हे कोण ? रागिणीकर्ते ? अनुकूल. सौ. अभ्यंकर ? बहुधा विरुद्ध [ जरा वाचून ] नाहीं नाहीं. अनुकूल. सर जोशी तर अनुकूलच असणार. हं हे कोण बोडस ? वाः तटस्थ आहेत ! "

" कां ? "

" म्हणे प्रस्तुत वाद अप्रासंगिक अन् अप्रशस्त वाटतो म्हणून. "

" अस्सं. "

भराभर डोळे फिरवून, नांवें व मतें वाचीत कुंदा म्हणाली,

" हे सारे सारे अनुकूल आहेत. मी सांगतें घे. [ वाचीत ] ' पातिव्रत्य हें हिंदु समाजांतील स्त्रियांचें अत्युच्च धार्मिक व नैतिक गडाचें सुंदर व देदीप्य शिखर आहे. "

स्त्री-पुरुषांना सारखंच बंधन असावं असं यांचं म्हणणं दिसतं. आणखीन् [ वाचते ] ' हिंदुविवाह हा कोणत्याहि बाबतीसाठीं मोडतां येईल असा करार नसून तो एक शास्त्रोक्त संस्कार आहे. म्हणून तो अनुल्लंघ्य आहे ' असं यांचं म्हणणं. "

' अर्थात् ! '

' " हा नियम फक्त हिंदु स्त्रीलाच " सुधा म्हणाली.

' बरं पुढचं पाहूं. '

' अग न पाहातांच मी सांगते ना ? थोड्या व्यक्ति सोडल्या तर बाकी सगळ्यांचीं मतं अनुकूल असणार.पहा हवं तर ! ' सुधा पृष्ठें चाळीत म्हणाली, ' थांब हे न्यायमूर्ति माडगांवकर काय म्हणतात तें पाहूं दे. '

तिच्याकडे रोखून पहात कुंदा म्हणाली,

' हो. सौ. भांडारकर म्हणतात त्याप्रमाणं यांच मत महत्वाचं खरंच. '

' अर्थात्. असें म्हणून सुधा मोठ्यानें वाचूं लागली,

' घटस्फोटाच्या कायद्याची आत्यंतिक आवश्यकता महाराष्ट्र आणि गुजराथी या प्रान्तांना आहे असें वाटत नाहीं, ' बघितलंस हें तज्ज्ञाचं मत ? '

सुधा तें पुन्हां लक्षपूर्वक मनांतल्या मनांत वाचूं लागली. तेव्हां तिच्या-पुढून पुस्तक उचलीत कुंदा म्हणाली,

' एखादी गोष्ट बिष्ट लिहिणार आहेत वाटतं यजमान ? त्याशिवाय एवढं सूक्ष्म वाचन-मनन करणार नाहींत विदुषीबाई. टांचण करून देणार, होयना ? '

' छट्, कांहीं तरीच. '

' सुधा शुष्कपणें हंसली. आपले मनोविकार सहज दृग्गोचर होतील अशा तऱ्हेनें आपण वागलों तर नाहींना ? या विचारानें ती अंमळ चमकली. आणि तसें झालें असेल तर त्यांत कांहींच अर्थ नाहीं असें भासविण्यासाठीं अंक दूर भिरकावून ती उठली. कुंदाहि उठून जाण्यासाठीं दाराकडे वळली. तिला थांबवीत सुधा म्हणाली, " थांब चहा करतें. " अंग थरारल्यासारखें करून हंसत कुंदा म्हणाली,

" नको ग बाई. मला आठवण आहे त्या दिवसाची. जातेंच मी— "

झटकन हात सोडवून जाणाऱ्या कुंदेकडे खिन्नपणें सुधा पहात राहिली. खिन्नपणेंच पुन्हां तो अंक हातीं घेऊन ती वाचूं लागली. एखादें लहान मूल मोठ्या पंक्तींत बसून भरल्या पानांतून फक्त आपणांस आवडणारे तेवढे पदार्थ खातें त्याप्रमाणें सुधा त्या पुस्तकांतून प्रस्तुत प्रसंगीं आपणांस ग्राह्य वाटणारीं मतेंच तेवढीं लक्षपूर्वक वाचीत होती— ' वैवाहिक प्रश्नांचा निर्णय ज्ञातिपंचायतींचा द्वारां देणाऱ्या पंचायतींनाहि शक्य तेथें कायद्यानें मान्यता मिळणें जरूर आहे. '

' हं ठीक आहे. खडतर झालेला जीवनक्रम शक्य तितका सुखावह होण्यासाठीं कांहीं तरी केलेंच पाहिजे. मग घटस्फोटाचा कायदा करून करा

किंवा ज्ञातिपंचायतींच्या निर्णयानें ठरवा. वियुक्त झाल्याशिवाय ज्यांना सुख लागणंच शक्य नाहीं अशा आमच्यासारख्या जोडप्यांना एकत्र रहाण्याची सक्ति करणं म्हणजे निव्वळ जुलूम आहे. आणि ही सक्ति पुन्हां एकतर्फी फक्त बायकांपुरती. दोघांवरहि सारखी असती तर टिकणंच अशक्य परदुःख मोठं शीतल खरं. म्हणे समाजाची घडी बिघडेल अन् अस्सं होईल. पण मनाची घडी बिघडल्यावर काय करायचं ? आमचंच पहाना ? दाखवायला, सांगायला कारणं अगदीं क्षुल्लक. पण खोल रुतलेला कांटा, दिसला नाहीं तरी बोंचल्याशिवाय रहात नाहीं. कारणं क्षुल्लक असलीं तरी मनाचं सुख नाहींसं करणारीं खात्रीनें आहेत. '

विचार करीत करीतच सुधा स्वयंपाकाला लागली. कामांत तादृश चित्त नसतां संवयीनें हात काम करीत होते. आल्यावर चहाबरोबर खाण्यासाठीं तिनें केळ्याचे अंजीर करून ठेविले. चहाची तयारी करून तिनें घाईनें स्वयं-पाक उरकला. रात्र झाली तरी पद्माकराचा पत्ता नाहीं. बऱ्याच उशिरां पद्माकराची स्वारी आली. आल्याबरोबर कोट-टोपी पलंगावर भिरकावून देऊन त्यानें मोजे काढून टेबलावर टेविले. बूट सतरंजीवरच पडूं दिले. नंतर कागद चाळून व त्यांतील हवे ते घेऊन तो लिहिण्यासाठीं टेबलापुढें बसला. त्याची ती लेखनाची तयारी पाहून सुधेच्या कपाळावर आंठ्या चढल्या. कडवट आंवढा गिळून ती रुक्षपणें म्हणाली—

' जेवण तयार आहे. '

' आलों हं. थोडी कल्पना सुचली आहे त्या कादंबरींतल्या एका प्रकरणांत घालायला. तेवढी लिहितों न् येतों. फार वेळ नाहीं. दहा पंधरा मिनिटांत आटपतों. किती वाजले ?

' फार नाहीं ! फक्त दहा ! '

पद्माकरानें स्मितपूर्वक पत्नीकडे पाहिलें. परंतु त्या स्मिताची स्वागतपूर्वक परतफेड करण्याच्या मनःस्थितींत सुधाबाई दिसल्या नाहींत. त्यानें टांक खालीं ठेवला व तो उठून स्वयंपाकगृहांत येऊन पाटावर बसला.

एक दोन घास खाल्ल्यावर तो म्हणाला, " वरणाला जिरं कां मीठ कांहीं तरी कमी झालेलं दिसतं "

सुधेनें ताटांतील मिठाकडे अंगुलिनिर्देश केला. '

' वरून मीठ घेतलं तरी तितकी चव येत नाहीं. आधींच बेतानं घातलं पाहिजे. हें काय कचकचीत ! "

' केळ्याचे अंजीर '

हातांतला अर्धा अंजीर तसाच टाकून व बशी पलिकडे सारून तो म्हणाला, ' आपल्याला नाहीं आवडत हे केळ्याचे अंजीर '

" ऊन ऊन खाण्याचा तो पदार्थ आहे. "

श्रमानें केलेल्या पदार्थाला वाईट शेरा मिळालेला पाहून उद्वेगानें ती म्हणाली,

' असेल; पण फळं जशींचीं तशीं खावीं हें उत्तम. शिजवून तळून त्यांचे नैसर्गिक गुणधर्म नाहींसे करून तीं पचायला जड करायचीं; खर्च अन् श्रम वाढवायचे आणि खाल्लं नाहीं हा वर बोल ठेवायचा. आमटीला रस घातला नाहीं वाटतं ? '

' खोबरं कांतून घातलं '

' तेव्हांच तिखट लागते. आमटीला रसच पाहिजे नारळाचा ! '

' कां ? पदार्थ जसेच्या तसे खावे असं आहेना ? रसापेक्षां कीस अधिक नैसर्गिक आहे. '

या टोल्यानें पद्माकराला हंसूं आलें. पण सुधेचा सुन्नपणा कायमच होता. तिच्याकडे अनुनयाच्या दृष्टीनें पहात तो म्हणाला, " खरं म्हणजे मला भूकच नव्हती. असं झालं. ते रामभाऊ वाटेंत भेटले अन् आग्रह करून त्या नव्या ' शो ' ला घेऊन गेले. अयोध्येच्या राजाला अजून आम्ही करभार दिला नव्हताच ! तेव्हां गेलों झालं. जातांना थोडा फराळ केला. थोडा कां चांगलाच. ऊन ऊन कचोऱ्या होत्या. तशांच चहाची वेळच झाली होती.

जरा जास्त झालं त्यामुळें भूक राहिली नाहीं. भूक नसली म्हणजे चांगले पदार्थही जात नाहींत. ”

सुधेच्या रागाचा पारा जास्तच चढला. अयोध्येचा राजा पहावयास जाण्याचें ती आज किती दिवस बोलत होती; व दरवेळीं ‘ त्यांत काय पाह्यचं ? वाटलं तर तूं जा. ’ असें पद्माकराकडून उत्तर मिळत होतें. आपल्याबरोबर यायला वेळ झाला नाहीं व मित्राबरोबर जातांना आपली आठवण झाली नाहीं. तसेंच घरांत काय अधिक उणें केलें तर तें तळलेलेंच, तें कृत्रिमच असे त्यांत दोष काढावे अन् इच्छा झाली म्हणजे मित्रांसमवेत बाजारचें वाटेल तें खावें. या गोष्टींचा राग येऊन ती म्हणाली, ‘ मग हे तर वाईट; ते कसे जातील ? ’

‘ छे बुवा, तुम्ही बायका म्हणजे अगदीं अर्थाचा अनर्थ करता. बरं, तें पुरें आतां. तुझं जेवण व्हायचं असेल ना ? बरोबरच कां नाहीं वाढून घेतलं ? उशीर किती झाला ? जेवून घे लौकर. ’

आपल्याला अन्न जात नाहीं. तरी त्याबद्दल कधीं चौकशी नाहीं. एकट्याला वाढलं तर बरोबरच पान घे असं सुद्धां म्हणायचं नाहीं. अन् म्हणे जेवण व्हायचं असेल ! अन् किती उशीर झाला ! जणूं काय मी आधींच जेवून घेतें अन् मीच उशीर करतें ! विचारांनीं सुधेचें डोकें संतप्त झालें. पण ती कांहीं बोलली नाहीं. सुधेनें दोन चार घास खाल्ले असतील इतक्यांत पद्माकरानें हांक मारली, ‘ रामा , रामा घरीं गेला असेल नाहीं ? ’ ‘ हो केव्हांच, तो किती वेळ थांबणार ? ’ ती मनांत म्हणाली, ‘ इतका वेळ थांबायला तो काय बायको आहे ! ’ ‘ नाहीं. त्याला सोडला हें बरं केलं. आम्हांला नेहमींच उशीर व्हायचा. आपल्यासाठीं त्याची खोटी नको. बरं मला जरा लिहायला बसायचं होतं. पण सगळा पसारा पडला आहे. ’

सुधेनें हात धुतले व रागारागानें कोट टोपी बूटमोजे जागच्या जागीं ठेवले. तिचा तो रागाचा आविर्भाव पाहून पद्माकर म्हणाला, ‘ एवढी आदळ आपट कां ? मी ठेवलं असतं. ”

" मग कां नाहीं ठेवलं ? टेबल काय मोजे ठेवायची जागा ? अन् बैठकीवर बूट ! म्हणे पसारा "

" आमचा पसारा आम्ही उचलला असता. सहज रामाला हांक मारली."

" त्याच्या वेळांत कधीं घरीं यायचं नाहीं. त्याचीं कामं करायला आहेच ना घरीं– "

" एवढ्याशा गोष्टीसाठीं एवढा त्रागा करण्यापेक्षां कांहीं न करतां स्वस्थ राहिली असतीस तर बरं झालं असतं. नसत्या मूर्खपणानं माझ्या सुंदर विचारांची धूळधाण मात्र केलीस. माझ्या स्त्रीदास्यविमोचनांत घालायला सुंदर विचारांची सांखळी मनांत योजून आलों होतों ती सगळी विस्कळित झाली."

" असूं देत मी मूर्ख. स्वतःची बायको चोवीस तास तैनातींत राबवून जगांतल्या बायकांच्या दास्याचा बीमोड करण्याचा नसता आभास उत्पन्न करण्याइतकी मी कुठं आहे शहाणी ? मूर्ख आहे म्हणूनच निभतंय. "

आपल्या लाडक्या तान्हुल्याला तीक्ष्ण शस्त्रानें कोणी टोंचलें असतां आईच्या हृदयाला जशा तीव्र वेदना होतात तशा सुधेच्या टोमण्यानें पद्माकराला झाल्या. लिहिण्याच्या कामीं प्रोत्साहन देणें, लेखनांत साह्य करणें या गोष्टी तर राहिल्या बाजूलाच. परंतु एखाद्या कुत्सित टीकाकाराप्रमाणें त्यांतील सुंदर स्थळांचा भलताच अर्थ कल्पून पत्नीनें असें वाक्ताडन करावें या गोष्टीचें त्यास परमावधीचें दुःख झालें. आपण लेखणीनें निर्माण केलेल्या उद्यानांतील सुंदर विचारकुसुमांचा परिमळ ग्रहण करण्याची पात्रता अंगीं असूनहि अरसिकपणें ती चुरगळण्याचा निर्दयपणा तिनें करावा याची त्याला चीड आली. तो त्वेषानें म्हणाला,

' अशा बोलभांड अरसिक बायकोशीं जन्माची गांठ असल्यावर कार्यांत कांहीं मदत होईल ही आशा फुकट आहे. अशी स्थिति वैऱ्याच्या वांट्याला नसावी. '

यावर सुधा बरेच खवळून बोलली. शब्दाला शब्द वाढत जाऊन मेघगर्जनेनंतर वृष्टि व्हावी त्याप्रमाणें सुधेच्या साहाय्याला शेवटीं गंगायमुना

धांवून आल्या. जोराच्या पर्जन्यवृष्टींत सांपडलेला आश्रयहीन पथिक ज्याप्रमाणें आंग चोरून निस्तब्ध उभा राहतो त्याप्रमाणें पद्माकर श्रान्त होऊन खुर्चीत पडून राहिला. सुधेनेंहि बसल्याजागीं बैठकीवर आंग टाकलें. रात्रभर तीं दोघें आपापल्या जागीं असहायपणें तळमळत होतीं. अलीकडे त्यांच्यामधील साध्या संवादाला शेवटीं भांडणाचें स्वरूप येत असे. गेलीं दोन तीन वर्षे मोठ्या प्रेमानें वागणारें जोडपें आपणच आहों काय असा त्यांचा त्यांनाहि अलीकडे प्रश्न पडत असे. प्रस्तुतचा प्रसंगहि त्यांतलाच होता. तीं आपापल्या मनाशीं कार्यकारणभावाची छाननी करीत होती. विचारानें पद्माकराचें डोकें बधिर झालें होतें आणि दुखावलेली सुधा दुखणें वेशीवर टांगण्याच्या निश्चयापर्यंत आली होती !

— २ —

" अगबाई सुधा ! ' सॉलिसिटर दिवेकरांच्या पत्नी फाटकांतून येत असलेल्या सुधेकडे अंगुलिनिर्देश करीत पतीला उद्देशून म्हणाल्या,

' ओहो सुधाबाई ! आज कुठें वाट चुकलांत ? '

' अन् एकट्याच, कां राजश्री येताहेत मागाहून ? '

पतिपत्नींनीं एकदमच प्रश्नांची सरबत्ती सुरू केली. परंतु उत्तर देण्याच्या मनःस्थितींत सुधा नव्हती. हंसणेंसुद्धां तिला धाडसाचें वाटत होतें. न जाणों हास्याऐवजीं अश्रूच ओघळतील या भीतीनें तिनें वर मान केलीच नाहीं. तिची ती अनपेक्षित मुद्रा व वृत्ति पाहून दिवेकर पतिपत्नींस आश्चर्य वाटलें.

सुधा ही त्यांच्या मित्राची कन्या. तिचा पद्माकराशीं विवाह जुळविण्याच्या कामीं त्यांनींच पुढाकार घेतला होता. मित्राच्या पश्चात् ते सुधेचा योग्य तो परामर्ष घेत.

गंभीरपणें पुढें येऊन सुधेनें काकूंच्या कुशींत तोंड लपवून अश्रुमोचनास प्रारंभ केला. तिच्या दुःखाचें कारण समजून घेण्यास त्यांना बराच वेळ लागला. सर्व ऐकून घेतल्यावर सॉलिसिटर साहेबांची स्वारी गंभीर झाली.

तें पाहून सुधा अधिकच अस्वस्थ झाली. आपली तक्रार यांना निरर्थक वाटली कीं काय असें वाटून ती अधीरपणें कांपऱ्या आवाजानें म्हणाली,

‘ आतां मी काय करावं काका ? ’

‘ कांहींच करूं नये. ’

तिची उदासीनता घालविण्याच्या उद्देशानें ते हंसत म्हणाले.

‘ संध्याकाळीं मी पद्माकराला घेऊनच येतों. तोंपर्यंत स्वस्थ रहा. संध्याकाळीं पाहूं काय तें. ’

संध्याकाळीं काकांबरोबर पद्माकर आला. त्यालाहि आपली बाजू मांडण्यास सांगण्यांत आलें. दोघांच्याहि कैफियतीचा मनाशीं विचार करीत दिवेकर काका स्वस्थ बसले होते.

ती स्तब्धता असह्य होऊन काकू म्हणाल्या,

‘ अष्टौप्रहर कायद्याशीं काथ्याकूट करणारांना एवढंसं भांडण मिटवायला इतका विचार करावा लागेल असं नव्हतं वाटलं मला. ’

सगळ्यांची दृष्टि काकांकडे वळली. ते हंसून म्हणाले,

‘ मला जें वाटतं तें सांगायचं म्हणजे दोनच शब्दांत सांगतां येईल, मी यांना सांगेन, दोघेंही घरीं जा. पण हा निकाल एकालाहि आवडणार नाहीं. दोघांच्याहि डोक्यांत वियुक्त होण्याचं वेड भरलं आहे. ’

‘ वेड ? ’ सुधा आश्चर्यानें पुढें म्हणाली,

‘ इतकं ऐकून शेवटीं वेडंच ठरवलं का ? कां स्त्रीचा प्रश्न म्हणून ’—

‘ नाहीं, मी दोघांनाहि सांगतों. दोघंहि वेडीं आहांत. कसलं भांडण घेऊन बसलांत ? चालायचंच. दाम्पत्यांत कलह झाला नाहीं तर तें सुखी जोडपंच नव्हे असं मी म्हणेन. चांगल्या प्रेमळ जोडप्यांत प्रेमकलह व्हायचाच. प्रेमकलह म्हणजे वैवाहिक जीवनांतील मीठ आहे. त्याशिवाय संसारांत गोडी नाहीं. पाहिजे तर तुझ्या काकीचा सल्ला घे. ’

‘ खरंच, काय एवढं तेवढं मनावर घेता ? दोघंहि तें विसरा अन् पूर्ववत् वागा. ’ काकी म्हणाल्या.

‘ अशक्य ’ सुधा पुटपुटली. ‘ वाटतं एवढं तेवढं, पण तसं तें नाहीं. ’

‘ काय पद्माकर, तूं कांहीं बोलत नाहींस ? तुझं मत काय आहे ? ’ काकांनीं प्रश्न केला.

‘ माझीं मतं कोणावरहि मला सक्तीनें लादायचीं नाहींत. ’

‘ या साखरपेरणीला फसण्याइतकी मी दुधखुळी नाहीं. ’

‘ असं काय ग सुधे ! शोभतं कां तुला हें ? ’

काकू कृत्रिम कोपानें म्हणाल्या.

‘ अहो काकू ! काय सोसावं लागतं हें माझं मलाच ठाऊक. सांगून खरं-सुद्धां वाटायचं नाहीं; पण सारा दिवस माझा चुलीशीं जातो. ’

काकू मोठ्यानें हंसत म्हणाल्या,

‘ येऊन जाऊन माणसं तर दोन तुम्ही. सारा दिवस खाण्याचाच उद्योग करीत असतां कीं काय ? ’

‘ तसंच म्हटलं तरी चालेल. कधीं अन् कितीदां चहा लागेल याचा घरबंध नाहीं. अन् जेवणाचाहि नाहीं सारा दिवस अन्न ऊन करीत बसावं किंवा पुन्हां ताजं करावं. माझ्या बरोबरीच्या मैत्रिणी किती पुढें गेल्या ! कुणी ग्रॅज्युएट झाल्या. कुणी नोकरी धंदा करतात. अन् ज्यांनीं लग्नं केलीं त्यासुद्धां सुखी आहेत अन् मी— ’

बोलतां बोलतां सुधेच्या डोळ्यांना पाणी आलें.

‘ अग पण तुम्हांलाही सुखानं रहायला कुणी नको म्हटलंय का ? कुठं जावं, यावं, एखाद्या संस्थेंस तूं कांहीं कार्य करावं. मग शिक्षणाचा उपयोग तो काय ? जावं थोडा वेळ शिकवायला. नाहीं तर खेळायला जावं. तेवढंच मोकळं वाटेल. या गोष्टी तुला कुणी सांगाशिकवायला पाहिजेत का ? एखादीनं कॉलेज न सोडतां तेवढी परीक्षा पदरांत पाडून घेतली असती—’

‘हो, खरं आहे. परीक्षा नाहीं तेव्हां स्वावलंबनाचा मार्ग बंद अन् आई-बाप नाहींत त्यामुळें माहेरचा मार्ग बंद. कुठें जायला जागा नाहीं. त्यामुळेंच ही दशा ! ’

" त्यांत एवढं काय लावून घेतेस ग ? आम्हीं परकी आहोंत कां ? पूर्वीसारखं इथं राह्यला आली असतीस किंवा कुणा मैत्रिणीकडे चार दिवस गेली असतीस तर तेवढं बरं नसतं का झालं ? खरं आहे सुधे, फळ कितीहि गोड असलं तरी त्याचा वीट येतोच एकसारखं खाऊन. तसंच चांगली तरी एकच एक स्थिति माणसाला सहन करवत नाहीं. म्हणून मधून मधून पालट पाहिजे. प्रेमळ जोडप्यांत क्षुल्लक कारणांवरून खटके उडूं लागले कीं असलेल्या स्थितींत बदल केला पाहिजे अशी खूणगांठ मनाशीं बांधून त्याप्रमाणें वागावं. आज चार पांच वर्षं तुम्हीं दोघंहि एकाच घरांत एकमेकांना कोंडून घेऊन आहांत त्यापेक्षां जरा मजेनें कुठं प्रवासाला गेलां असतां तर रोजच्या आयुःक्रमांतून मुक्तता झाल्यामुळं मनाला अन् शरीराला हुशारी वाटली असती अन् हा चिडचिडेपणाचा रोगहि नाहींसा झाला असता. " ' विवाहित स्त्रियांनीं एकटंच कुठं मजेनें जाणं बरं दिसतं का काकू ? "

' माझा व्यवसाय सांभाळून मला कुठंहि जाता येणं शक्य नाहीं. पण मी कांहीं कोणाला आडकाठी केली नव्हती. खुशाल एकाद्या संस्थेंत काम करावं किंवा क्लब जॉईन करावा. ' ' असं पहा काकू, कांहीं करायचं म्हणजे त्याला नियमितपणा नको का ? आमच्या इथं थोडक्यांत सांगायचं म्हणजे लोकांची जेवणाची वेळ तेव्हां आमची चहाची अन् लोकाची विश्रांतीची तेव्हां आमची जेवणाची. आणि रात्रीचंहि तसचं. सारं जग झोपलं कीं आमच्याकडे उजाडतं लिहायला. '

काका हंसून म्हणाले,

' पद्माकर हें मात्र वाईट हं. माणसाला कांहींतरी नियमितपणा हा पाहिजेच. '

' मला जो वेळ सोईस्कर वाटतो त्यावेळीं मी लिहितों. माझ्यासाठीं खोळंबून रहा असं मी कधीं कुणाला सांगत नाहीं. उलट ' चहा आणूं कां ?' ' भूक लागली कां ?' ' झोपा लौकर ' ' जेवा लौकर ' अशी मध्येंच कटकट लावून हीच माझ्या लिहिण्याच्या कामांत व्यत्यय आणते. '

तें अनुभवी वृद्ध जोडपें हें ऐकून एकमेकांकडे पाहून हंसलें. सुधा रड-कुंडीस येऊन म्हणाली,

‘ ऐकलं काकू ? असं आहे. दुसऱ्याला कांहीं मन आहे, त्या मनाच्या कांहीं गरजा आहेत, असं कधीं वाटलेलं आठवत नाहीं मला. आपण लक्ष द्यायचं नाहीं वेळ नाहीं म्हणून; पण दुसऱ्यानं करमणूक करून घेऊं म्हटलं, तर तेंहि खपायचं नाहीं. कुणी मैत्रिणी घरीं आल्या— ’

‘ खोटं ’

खांदे उडवीत पद्माकर मध्येंच म्हणाला.

‘ अगदीं खोटं. एकदां असं झालं. रात्रभर जागून मी लिहित होतों. सकाळींहि लौकर उठलों. त्या प्रकाशकाशी अन् त्या नाट्यकंपनीशी माझ्या त्या नव्या कादंबरी व नाटकाबद्दल ठरवायचं होतं. त्यांत दोन प्रहरपर्यंत वेळ गेला. त्यानंतर येऊन कांहीं वेळानं जरा पडलों तों फोनो, पेटी, हसणं, गडबड यामुळं डोळा लागणं अशक्य झालं, तेव्हां—’

‘ इतक्या बायकापुढें एकदम येऊन ‘ काय हा गोंधळ ? ’ असं म्हटलं ! ’

‘ अगबाई ! ’ काकू उद्गारल्या.

‘ ती कुंदा पहिल्या वर्गांत पास झाली म्हणून तिला न् चार जुन्या मैत्रिणींना बोलावलं होतं मी चहाला. पण अशा बोलण्यानं पांच मिनिटांत सगळयाजणी निघून गेल्या अन् तेव्हांपासून कोणी येत नाहीं आमच्याकडे. ’

‘ पद्माकर, हें मात्र बरं नव्हे हं. एवढे रातंदिवस श्रम करण्यापेक्षां जरा तिच्याबरोबर सुखानें वागलास तर काय होईल रे ? ”

‘तिला सुखानं राहता यावं म्हणून तर मला एवढे श्रम करावे लागतात. ’

‘ मुळीच नाहीं. ’

सुधा जोरानें म्हणाली.

‘ त्या अध्यात्मविज्ञानांत डोकं खुपसून राहिल्यानें माझं कोणतं सुख किंवा संपत्ती वाढली आहे ! म्हणे माझ्यासाठीं श्रम करावे लागतात. कधीं एकादी वेणीसुद्धां आणल्याचं आठवत नाहीं— ’

‘ कशाला आणायला पाहिजे ? दारावर काय येत नाहींत वेण्या ! हवी तर घ्यावी. ’

सुधेला तें उत्तर असह्य वाटलें. तिचे डोळे अश्रूंनीं डबडबले. ओंठ कापूं लागले. तिची ती स्थिति पाहून काका म्हणाले, ‘ अत्यंत सुखी जोडपं कोणतं असा जर मला कोणी यापूर्वी प्रश्न केला असता तर बिनदिक्कत मी तुमच्याकडे बोट दाखवलं असतं. पण आतां पहातों तों इतकं मनोमालिन्य बाहेर आलं ! बरं, आतां पुढं काय ! यापुढं तरी सारं विसरून— ’

यावेळीं पद्माकराचा सारा स्वाभिमान जागृत झाला. आपणाजवळ मोकळ्या मनानें बोलण्याऐवजीं मनांत कुढून शेवटीं दोघांतील भांडण चव्हाट्यावर मांडल्याबद्दल त्याला पत्नीचा संताप आला. त्या आवेगांत तो एकदम म्हणाला,

‘ छे, छे, तें आतां शक्य नाहीं ’

सुधा यापूर्वी हेंच बोलली होती; व आतांहि हेंच उत्तर तिच्या जिव्हाग्रीं आलेलें होतें. परंतु तेंच पद्माकरानें न कचरतां उच्चारलेलें ऐकून तिला चमत्कारिक वाटलें. वेड्यासारखी ती टकमक पाहूं लागली.

‘मग काय सुधा ? कोणीच माघार घ्यायला कबूल नाहीं ? तुमचं दोघांचं ठीक आहे पण संतति— लौकरच जन्मास येणाऱ्या मुलाचं काय ? तुमच्या भांडणाचे परिणाम त्याला भोगावे लागतील— ’

‘ कां म्हणून ? ’

सुधा जोरानें म्हणाली.

‘ कोणत्याहि स्थितींत आईला आपलं मूल नकोसं होत नसतं. जिवापलीकडे ती आपल्या बाळाला जपत असते ’

‘ अन् बाप हाल करीत असतो वाटतं ? भावी बालकाची काळजी घ्यायला मी समर्थ आहें. आईजवळ रहाण्याची गरज संपली कीं माझ्याजवळ घेऊन जाईन. ’

‘ कांहींतरी सबबी पुढें करून आईपासून मूल वेगळं करणं हें सहृदयतेचं लक्षण नाहीं. ’

सुधा आंवढा गिळून म्हणाली.

‘ सहृदयतेचं असो वा नसो. कायदा तसाच आहे. ’

पद्माकर ठांसून म्हणाला,

‘ कायद्याचं काय ? स्त्रियांच्या बाबतींतले सारे कायदे म्हणजे माणसानं काढलेलं सिंहाचं चित्र ! कायदे करण्यांत बायकांचा हात असता तर यापेक्षां अधिक विचारपूर्वक कायदे तयार झाले असते. ’

‘ झाले असते किंवा पुढें होतील हा वाद आतां कशाला ? तूर्त तरी मूल म्हणजे बापाची प्रॉपर्टी आहे. ’

“ आईवर अवलंबून राहण्याची गरज संपली कीं, निदान या बाबतींत तरी आम्हीं असेंच केलं पाहिजे नि तसंच केलं पाहिजे अशी कोणाला सक्ति करतां येणार नाहीं. ”

आपल्याला कायद्याचें सूक्ष्म ज्ञान आहे या अभिमानानें काका व सुधा यांच्याकडे आळीपाळीनें पहात एकएक शब्द सावकाश उच्चारीत पद्माकर म्हणाला. परंतु सुरी हळूहळू चालविली तरी जखम झाल्याशिवाय रहात नाहीं. सुधेंच हृदय त्या वाग्बाणांनीं विद्ध झालें आणि त्या वेदनामुळें तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

दोघांकडे पहात समजुतीच्या स्वरानें काका म्हणाले—

“ पहा, आपसांत तडजोड होत असेल तर, नाहींतर मला आमचे भागीदार पोपटलाल यांचेकडे हें प्रकरण सोंपवावं लागेल. हो, कारण मी कसाही वागलों तरी पक्षपाताच्या आरोपांतून मुक्तता व्हायची नाहीं माझी ! ”

कोणीच उत्तर दिलें नाहीं. मौन संमतिलक्षण समजून ते पुढें म्हणाले—

“ बरं तर. उद्यांपासून कांहीं दिवस मी बाहेरगांवीं गुंतलेला आहें. तेथून आल्यावर पोपटलालला मी सांगेन. सगळी केस समजावून त्यांच्याच सल्ल्यानें करूं काय तें नक्की. ”

‘ ठीक, घेतों रजा तर ? ’

असें बोलून पद्माकर उठला व सुधेकडे दृष्टिक्षेपहि न टाकतां चालूं लागला.

बिचारी सुधा आपण कोणत्या मार्गाचा अवलंब करावा हें न सुचून भांबावलेल्या मुद्रेनें उठून उभी राहिली. तिच्याकडे अंगुलिनिर्देश करून पत्नीला उद्देशून काका म्हणाले,

' हं सुधेला आंत ने. '

काकूंनीं हात धरतांच सुधेला कसेंसेंच झालें. परित्यक्त परिस्थितीच्या जाणीवेनें आलेले अश्रू लपविण्यासाठीं ती घरांत गेली.

सुधा आपल्याशींच दुःख करीत राहील म्हणून तिला क्षणभर एकटी राहूं न देण्याविषयीं पत्नीला बजावून दुसऱ्या दिवशीं काका बाहेरगांवीं गेले.

आणखी दोन दिवसांनीं सुधेच्या करमणुकीकरितां काकूंनीं एक लहानसें स्त्रियांचें संमेलन भरविलें. क्रमाक्रमानें सर्व निमंत्रित स्त्रिया आल्यावर त्यांच्याशीं काकूंनीं सुधेचा परिचय करून दिला. दोन तीन जास्त सलगीच्या मैत्रिणींना तिचा व तिच्या पतीचा परिचय करून देणें, बेबनावांचीं कारणें व तेथें येण्याचा उद्देश सांगणें काकूंना अपरिहार्य होतें. प्रथम दोघी चौघींनींच काकूजवळ चौकशी केली. नंतर काकूंना न विचारतां बायका आपापली माहिती नवीन जिज्ञासूंना सांगूं लागल्या. आपल्याविषयींचीं कुरकुरीत चर्चा कानावर आदळत असल्यामुळें सुधेला वर बघण्याचा धीर होईना. सहज मान वर केली तर कोणी तरी आपणाकडे चौकस दृष्टीनें बघत आहे, आपापसांत कुजबुजून हंसत आहे, असें तिच्या दृष्टोत्पत्तीस येई. जणूं काय आपल्या नादानपणाच्या वर्तनाचा उपहास करण्याकरितांच हें संमेलन भरलें आहे असें तिला वाटलें. तिला अतोनात दुःख झालें. या साऱ्या दुःखाचा उत्पादक आपला पती. त्यानें नुसतें ' चल ' म्हटलें असतें तरी आपण गेलों असतों आणि या साऱ्या वनवासांतून मुक्त झालों असतों असें वाटून मनांतून ती त्याच्यावर फारच चिडली. त्याच्या शेवटच्या वाक्यांची आठवण होतांच तिच्या दुःखाला जोराची भरती आली. दुःखाला वाट करून देण्यासाठीं ती आपल्या खोलींत गेली पण ते हलकें होण्याऐवजीं वाढलें मात्र.

कुठेंहि कुणालाहि आपल्याशिवाय चर्चेला दुसरा विषय नाहीं अं. ! '

अथांग सागरावरील असंख्य लाटांवर हेलकावे खाणाऱ्या दुर्दैवी प्राण्याला एकहि लाट सुरक्षित स्थळीं नेऊन पोंचवायला समर्थ नसते तद्वत सुधेच्या हृदयसागरांत उचंबळणाऱ्या असंख्य विचार विकारांच्या लाटा तिला एकाहि निश्चित् विचारापर्यंत आणूं शकल्या नाहींत. विचारानं जड झालेलं डोकें दोन्हीं हातांनीं दाबून धरून ती मोठ्यानें म्हणाली,

' देवा काय करूं ? मला कांहीं समजत नाहीं ! '

तिनें नकळत मोठ्यानें उच्चारलेल्या वरील उद्‌गारांनीं कळवळून काकू तिच्या खोलींत आल्या आणि ममतेनें तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाल्या—

' काय ग बाळ ! असं काय करतेस ? बरं वाटत नाहीं का तुला ! ' सुधेनें अश्रुसिक्त दृष्टीनें काकूंकडे पाहून पुन्हां वरील वाक्य उच्चारलें तेव्हां काकू म्हणाल्या,

' हा वेडे ! असा का कुठें धीर सोडतात ? अग तूंच जर असे हातपाय गाळून शरण गेलीस तर पद्माकराचा वरचष्मा नेहमींच कायम राहील. तुझ्या-सारख्या शिकल्या सवरलेल्या बायकोला तो ताटाखालच्या मांजरागत वागवतोना ? मग यावरूनच इतर थोडं शिकलेल्या बायकांना हे अरेरावी पुरुष— स्वत: कमी शिकलेले असले तरी— कसं वागवीत असतील याची कल्पना कर ! अग तुझ्या एकटीच्या अशा भ्रामक सुखाचा विचार मनांत आणून तूं सगळ्या स्त्रीजातीला मार्गदर्शक होण्याची आलेली संधि गमावणार काय ? तूं आपली आतां— यांतून मोकळी झालीस कीं कुंदाबरोबर कॉले-जांत जायला लाग. अन् परीक्षा उतरली कीं लग्न झालेल्या बायकांची स्थिति सुधारण्याच्या कार्याला वाहून घे. पास झालीस तर शेंदीडशें रुपयांना कुठेंच मरण नाहीं. शिवाय तुझ्या योग्यतेप्रमाणें त्याला पोटगी द्यायला भाग पाडूं, बघ—'

काकूबाईची चर्पटपंजरी सुधेच्या कानांवर आदळत होती व अर्थ हृदय भेदीत होता.

आपला व पतीचा मतभेद असला तरी दुसऱ्यानें त्याला कमी लेखलें असतां आपल्याला कशा यातना होतात, हें काकूंना कसें व्यक्त करून दाखवावें हें तिला कळेना. अगतिकपणें ती उद्गारली,

‘ हायरे दैवा ! काय हे धिंढवडे ! ’

— ३ —

पद्माकर घरीं आला तेव्हां रात्र बरीच झाली होती. डोक्यांत विचारांनीं व पोटांत भुकेनें अगदीं काहूर उठविलें होतें. एकंदर घटनेमुळें त्याच्या शरीराला विलक्षण ग्लानी आली होती. घरांत येतांच त्यानें आपला श्रान्त देह पलंगावर झोकून दिला. बराच वेळ त्यास झोप लागेना; व शेवटीं लागली तीही अस्वस्थ व स्वप्नमय. पहांटे जेव्हां तो जागा झाला तेव्हां आंतल्या खोलीच्या दारांतून हिरवा पदर वाऱ्यानें फडफडत असलेला त्याला दिसला.

‘ हेंच तें सुधेचें बदामी लुगडें ! नेहमींप्रमाणें आपल्या उठवण्याची वाट पहात ती चहाची तयारी करीत तिथें उभी आहे तर ? मग ज्या घटनेच्या विचारामुळें सारी रात्र आपला मेंदू शिणला व शरीरांतलें त्राण नाहींसें झालें ती घटना स्वप्नांतच घडली तर ? उगीच आपण तिच्यावर संतापलों ! ’

काल संध्याळपासून त्याच्या पोटांत पाण्याचा थेंब गेला नव्हता. रोज याच वेळीं तो पहिला चहापानविधि उरकीत असे. चहाच्या आठवणीनें त्याला चैतन्य आल्यासारखें वाटलें . मोठ्या आशेनें उठून तो हळूच त्या खोलींत गेला. तों काय ?

पलंगाच्या दांडीवर सोडून ठेवलेल्या लुगड्याच्या पदर खिडकीमधून येणाऱ्या वाऱ्यानें हळूहळू हालत होता !

पद्माकराल कालच्या सर्व गोष्टी आठवल्या. ज्यास स्वप्न मानून आपण आपल्या मनाची फसवणूक करून घेऊन समाधान मानीत होतों तें कटु सत्य

आहे, हें ती गेली तरी तिचा प्रतिनिधि डौलानें फडफडून आपणांस पटवीत आहे; आपल्या नादानपणाची तो निर्जीव पदर जणूं काय थट्टाच करीत आहे असें वाटून त्याला राग आला. त्यानें चडफडतच मुखमार्जन उरकलें; आणि चहाची आराधना मांडली.

' छे, नुसत्या स्टोव्हनें भागतं आहे कां ? स्पिरिट, काकडा, काड्या— फारच भानगडी बोवा. '

स्टोव्ह पेटल्यावर तो पातेली, किटली इत्यादि शोधायला लागला. शेवटीं कसा तरी एकदाचा चहा तयार झाला. स्टोव्ह बंद करून त्यानें तो चहा पेल्यांत गाळून घेतला आणि दूध पाहातो तों कुठेंच नाहीं. ' रोज तर पहांटेच गवळी येतो, आज त्यानेंहि संप फुकारला कीं काय ? हो पण आला असला तरी घेणार कोण ? घेणारीन तर-- ' त्यानें त्या काषायाचा एक घोंट घेऊन पाहिला व तोंड वेडेंवाकडें केलें.

' चहासाठीं आतां एखाद्या विश्रांतिभुवनांतच गेलं पाहिजे. ' असें बोलून तो तेथून उठला.

विश्रांतिभुवनांत चहा पिऊन व वाचनालयांत थोडा वेळ घालवून पद्माकर घरीं येतो तों रामा गडी दाराशीं बसलेला.

' कुठें होतास रे ? '

' काल सांजचा आलों होतों अन् आतां सकाळीच आलों. दोन्ही वेळां दाराला कुलूप. भांडीवाली पण येऊन गेली. '

' बरं, झटपट तूं घे दोन भांडीं घांसून अन् स्टोव्हवर भात टाक. वेळ झाला. तोंपर्यंत मी आंघोळ करतों. ' स्नान आटोपून पद्माकरानें टॉवेल धोतर मागितलें तों तीं दोन्हीं कालपासून धुवायचींच पडलीं आहेत असें रामानें जाहीर केलें !

दुसरें धोतर काढून नेसत असतां पद्माकर मनाशीं म्हणाला,

' एका दिवसांत काय ह्या घडामोडी ! हींच कामं विनबोभाट वेळच्या-वेळीं होत होतीं, आणि आज किती गोंधळ पडला आहे ! नेहमीं हाताशीं

असणाऱ्या दूध, भांडीं, कपडे, काड्यापेटी यांसारख्या क्षुल्लक वाटणाऱ्या जिनसांच्या अभावीं आज किती अडवणूक झाली. प्रत्येक क्षुल्लक वाटणाऱ्या वस्तूचं त्यावेळीं महत्त्व आहे आणि त्यांची जेथल्या तेथे वेळच्यावेळीं चातुर्यानें योजना करतांना स्त्रियांना श्रम होत असले पाहिजेत व त्या श्रमाचें चीज व्हावें असें त्यांना वाटत असलें पाहिजे; आणि तें फारसें गैर नाहीं ही गोष्ट त्यानें आपल्या मनांतील खोल दालनांत मान्य केली.

तथापि तसें असलें तरी सुधेनें इतकें विरुद्ध टोंकाला जाण्यापूर्वी आपणाशीं मोकळेपणीं विचारविनिमय करायला पाहिजे होता. तिचा हा प्रमाद त्याला अजूनहि क्षम्य वाटत नव्हता. आपणापेक्षां मन मोकळें करायला दुसरीं माणसें तिला अधिक जवळचीं वाटलीं हें शल्य त्याला बोंचत होतें. त्यासाठीं तो वारंवार मनांत सुधेवर चिडत होता.

— ४ —

कुणी चिडो अथवा आनंदांत असो. काळ कांहीं कुणासाठीं थांबून रहात नाहीं. एका मागून एक दिवस गेले आणि काकांच्या घरीं आल्यापासून तीन महिन्यांनीं सुधेला मुलगा झाला. तें आनंदाचें वर्तमान पद्माकराला कळविण्यांत आलें. या तीन महिन्यांत पद्माकर काकांकडे फिरकला नव्हता. आपल्यापासून वियुक्त होऊं इच्छिणाऱ्या पत्नीकडे जाणें त्याला कोडगेपणाचें वाटत होतें.

परंतु काय असेल ते असो मुलगा झाल्याचें ऐकून त्याला पहाण्यासाठीं पद्माकराचें हृदय आतुर झालें होतें. तरी आपण होऊन जाणें म्हणजे आपला पराजय कबूल करणें असें त्याच्या मनाला वाटत होतें. आणखी कांहीं दिवस धीर धरला तर बारशाचें आपल्याला खात्रीनें आमंत्रण येईल, तेव्हां त्या संधीचा फायदा घेऊन जाऊं असें मनोराज्य तो मनांत करीत होता. परंतु त्यांतहि त्याची निराशा झाली. बारशाचें आमंत्रण आलें नाहीं त्यामुळें तो मनांत अधिकच संतापला.

मधल्या या काळांत त्याला जो मानसिक ताण बसला त्याचा परिणाम शरीरावर होऊन तो आजारी पडला. त्यावेळीं तर पत्नीच्या गैरहजेरीची जाणीव तीव्रतेनें होण्यासारख्या गोष्टी पदोपदीं घडल्या. त्यांतच शेजारी व मित्रमंडळी तिच्या गैरहजेरीविषयीं बोलून तर मुलगा झाल्याबद्दल पेढे मागून आणि स्वतः त्रास सोसून एकमेकांस सुख देण्यास तत्पर असल्याबद्दल त्याची वाखाणणी करून त्याच्या हृदयाची जखम ताजी राखीत. त्यामुळें मनांत राग व दुःख दाटत असतांहि हास्यमुखानें कांहीं तरी सांगून त्याची समजूत त्याला करावी लागे.

मुलगा झाला या आनंदाच्या प्रसंगीं तरी मनांतली अढी सोडून आपली पत्नी आपणांस बोलवील अशी त्याला आशा वाटत होती. पण ती फोल ठरल्याचें पाहून सखेदाश्चर्य वाटलें. त्याचा उलगडा एके दिवशीं काकांनीं केला.

' बाळंतपणानंतर सुधा फार आजारी होती ती नुकतीच सांवरत आहे. '

हा खुलासा ऐकून पद्माकराला जरा बरें वाटलें. ' दोष तिचा नसून आपला आहे. उगाच आपण संतापलों ! '

आपल्या प्रियजनांना स्वतः पहावयास जाण्याचें त्यानें ठरविलें. त्याप्रमाणें तो काकांकडे जाऊन आपल्या आगमनाची वर्दी देण्यासाठीं हॉलमध्यें थांबला असतांना पुढील संवाद त्याच्या कानीं आला.

' आम्हीं उगाच पद्माकराला दोष देत होतों. तो सुद्धां आजारी आहे म्हणे. ' ' तरीच इतक्या दिवसांत आले नाहींत. ' काकू बोलत होत्या. तें ऐकून सुधा चटकन उद्गारली ' आजारी ? अगबाई ! मग फारच हाल होत असतील ? मी इथं चैनींत अन् तिकडे— काकू, मला आत्ताच गेलं पाहिजे ? '

' अग तूं बाळंतीण अन् जीवावरल्या दुखण्यांतून नुकतीच सांवरते आहेस— '

' हो, पण मी बरी असून तिकडे आजारी असावचं —

‘ पण तूं काय करणार जाऊन ? डॉक्टरला पाठवायला सांगते— ’

‘ तरी मला गेलंच पाहिजे. माझ्याशिवाय उपचार व्हायचे नाहींत नीट ! डॉक्टर गेले तरी उपचार करायला तिथं कोण आहे दुसरं ? दुखण्यांत स्वतःचं स्वतःला कांहीं कळत नसतं. त्या साऱ्या खोडी मलाच माहीत दुसऱ्या कुणाला कांहीं कळायचं समजायचं नाहीं. ’

तिची ती काकळूत पाहून काकूंना हंसू आलें.

काकांच्या बाजूला त्यांनीं एक साभिप्राय दृष्टिक्षेप केला. बाहेर पद्माकराचें हृदय भरून येऊन डोळ्यांत आनंदाश्रु चमकले. आवेगाच्या भरांत आंत येऊन तो म्हणाला,

‘ म्हणूनच घ्यायला आलों आहे वैद्याला. ’

तिचा लहानसा नाजुक फिक्कट हात त्यानें आपल्या कृश हातांत घेतला. तो पुष्कळ दिवस अंतरलेला चिरपरिचित स्पर्श आणि ते आश्वासनाचे शब्द अनुभवून व ऐकून दोघांच्या मनांत ठाणें देऊन बसलेल्या द्वैताचा त्याक्षणीं त्यांना अजिबात विसर पडला ! सुखसंवेदनेच्या जाणिवेनें त्यांचीं हृदयें पुलकित झालीं. आनंदाश्रूंच्या दाटीनें दृष्टि मंद झाल्यामुळें काका, काकू तेथून केव्हां निघून गेलीं हें त्यांना कळलें देखील नाहीं !

---

## दैवाचा खेळ : : ३

"ट्याँहा, ट्याँहा, ट्याँहा.... "

नवबालकाचा रोदन–ध्वनि कानीं पडतांच वेदनांमुळें विव्हळणारी ती नवप्रसूता स्तब्ध झाली. श्वास रोधून ती सभोंवार पाहूं लागली.

" मुलगा ! मुलगा झाला हो ! "

परिचारिकांनीं हंसत हंसत उच्चारलेली ती अमृतवाणी ऐकून नुकतीच वेदनांनीं विव्हळणारी माता डोळ्यांतून अश्रू ओघळत असतांहि हंसूं लागली. तिला तो रोदन–ध्वनि सुस्वर संगीतासारखा कर्णमधुर वाटला! त्यानें तिचा सारा शीणभाग नाहींसा झाला !

नवबालकाचा पहिला रोदनस्वर इतका अपूर्व वाटण्यासारखीच हिराबाईची परिस्थिति होती. यापूर्वीं प्रसूतीच्या दिव्यांतून चार-पांच वेळां ती पार पडली होती. परंतु आपल्या बालकाचा विवक्षित असा प्रथम रोदन–ध्वनि यापूर्वीं फक्त एकदांच तिच्या कानीं पडला होता. प्रत्येक खेपेला त्या अपूर्व संगीताची ती उत्कंठेनें अपेक्षा करी आणि अकालीं प्रसूति किंवा जन्मतःच मृत्यु या कठोर दैवदुर्विलसितानें ती फोल ठरत असे.

पहिल्या मुलाच्या जन्मानंतर जडलेल्या ज्या विकृतीमुळें ही दुःखपरंपरा

कोसळत असे, ती विकृति तज्ज्ञांकडून वर्षभर उपचार करून नाहींशी केल्या-नंतरच आजचा हा आनंदाचा दिवस उजाडला होता.

लगतच्या खोलींत पुन्हा ‘टयाँहा’ ध्वनि सुरू झालेला ऐकल्यामुळें चमकून, जवळच असलेल्या परिचारिकेला उद्देशून हिराबाई म्हणाली,

“ कुणी आणखी आत्तांच बाळंत झाली वाटतं ? ”

“ हो तर काय ! हें बाळंतपणाचंच हॉस्पिटल आहे. इथं हें रहाटगाडगं नेहमीं चालायचंच ! तुम्हीं ही ‘ लेबर रूम ’ अडवल्यामुळं तिला शेजारच्या खोलींत घ्यावी लागली. तिकडेच गेल्या आहेत साऱ्याजणी. तुम्हीं जरा स्वस्थ पडून रहा हं. मी बेबीला न्हाऊं घालून आणतें ! ”

“ मुलगा – मुलगाच ! ”

बाहेर कोणीतरी कोणाशीं वरीलप्रमाणें बोलत असलेलें ऐकून हिराबाई परिचारिकेला म्हणाली,

“ सांभाळा हो, तिलासुद्धां मुलगाच झालाय. माझं बाळ—दोन्ही मुलगेच असले म्हणजे बदलायची भीति ! नाहीं ? ”

यावर खो-खो हंसत परिचारिका म्हणाली,

“छट्, कांहींतरीच ! इथं एका वेळीं दहा-दहा मुली किंवा मुलगे असतात; कधीं कधीं अधिकहि असतात. तुम्हीं आलांत आज नव्यानंच इथं बाळंत-पणाला; पण आमचा जन्म गेला ह्या कामांत. एक आया हाताशीं घेऊन भराभरा सबंध वार्डातलीं मुलं न्हाऊं घालतें मी एकटी, पण बिशाद काय इकडचं मूल तिकडे होईल ! ”

“ अगबाई, मग तर फारच भीति ! इथंच नाहीं का आंघोळ घालतां येणार ? ”

असल्या बाष्कळ प्रश्नाला काडीचेंहि महत्त्व नाहीं हें कृतीनेंच दाखवण्याच्या उद्देशानें ती बाई तें मूल घेऊन हंसत हंसत स्नानघराकडे चालती झाली. तेथें जाऊन तिनें आपल्या व्यवसाय-भगिनींना तें हिराबाईचें बालिश विधान निवे-दन केलें. त्या मैत्रिणी खो-खो हंसत आपापसांत चर्चा करूं लागल्या.

" पहिलटकरीण आहे वाटतं ? "

" छे हो, ही पांचवी का सहावी खेप वाटतं— "

" बापरे ! पांच-सहा मुलांची आई, अन् असं म्हणाली ! मग ' सेपरेट रूम' कां नाहीं घेतली तिनं ? "

" हो, मग झाली असती तिथंच मूल न्हाणायची सोय ! "

" अग चूप, चूप ! ती पहा सिस्टर येते आहे डॉक्टरला घेऊन. "

डॉक्टरांनीं ' सिस्टर ' समवेत बाळ-बाळंतीण पाहून योग्य त्या सूचना दिल्या. तेव्हां त्या पहिल्या परिचारिकेनें हलक्या आवाजांत हिराबाईचें विधान हंसत हंसत सिस्टरला सांगितलें आणि " काय ? " म्हणून डॉक्टरनीं पृच्छा केल्यावरून सिस्टरनें तें त्यांस सांगितलें. तें ऐकून गंभीरपणें ते इंग्रजींत म्हणाले,

" हंसूं नका, अशानें तिच्या मनावर परिणाम होईल. तिचीं बरींच मुलं जन्मतःच गेल्यामुळें तिचं मन असं हळवं होणं साहजिकच आहे. तिच्याशीं मायेनं वागा, तिच्या कलानंच घ्या, समजलं ? "

स्वतः डॉक्टर आणि सिस्टर यांनीं जातांना गोड, मृदु शब्दांत नवप्रसवा हिराबाईला " भिण्याचें कांहीं कारण नाहीं; येथें बाळबाळंतिणीची नीट काळजी घेतली जाईल; कांहीं त्रास वाटला तर आम्हांला सांगा " असें आश्वासन दिल्यामुळें अधीर झालेलें तिचें मन जरा शांत झालें.

जवळच्या पाळण्यांत शांतपणें निद्रासुख घेत असलेल्या आपल्या गोजिर-वाण्या बालकाकडे दृष्टि लावून बाह्यतः शांतपणें ती बिछान्यावर पडून राहिली होती खरी; परंतु तिच्या हृदयांत उसळून राहिलेल्या आनंदाच्या आवेगाला तें चिमकुलें स्थान अपुरें पडत होतें. आपल्या सुहृदांना या उसळत्या आनं-दाचे वांटेकरी करून आपला आनंद केव्हां द्विगुणित करूं असें तिला होऊन गेलें होतें. त्यामुळें आतुर उत्कंठेनें ती त्यांच्या वाटेकडे मधून मधून डोळे लावीत असे.

पुत्रजन्माची आनंददायक वार्ता, साशंकपणें बाहेर तिष्ठत राहिलेल्या शशि-

कान्तांना समजली; तेव्हां उल्हसित हृदयानेंच त्यांनीं बाळंतिणींच्या वॉर्डमध्यें प्रवेश केला.

अहाहा ! तें गोजिरवाणें तान्हुलें ! त्याला पाहतांच त्यांची चिंता, श्रम सारें नाहींसें झालें. पुढें वांकून बाळाकडे निरखून पहात ते म्हणाले,

" अशींच असतात का सारीं लहान मुलं ? "

त्यांचा पहिला मुलगा हिराबाईच्या माहेरीं जन्मला होता व दीड महिन्यांनीं त्यांच्या दृष्टीस पडला होता. नुकतेंच जन्मलेलें व आपल्या हातापायांची व डोळ्यांची हालचाल करणारें बालक त्यांच्या आजच प्रथम दृष्टीस पडत होतें. कुतूहलानें त्याच्याकडे पहात ते म्हणाले,

" नाक पहा, फुगीर गालांत गडून गेलंय अगदीं ! कां लहानच आहे जरा ? "

हिराबाई मान हालवून म्हणाली,

" छे; लहान नाहीं कांहीं. पुढें होईल ते सारखं तरतरीत. डोळे पाहिले का ? "

" हो, थेट तुझ्यासारखे— "

" नाहीं, आपणासारखे – माझे काय वाटोळे डोळे आहेत ? "

आपण तिच्या लांबट डोळ्यांवरून तिला मीनाक्षी म्हणून चिडवीत असूं, तें आठवून शशिकान्तांना हंसूं आलें. नंतर बाळाच्या उघड्या डोक्याकडे पहात ते म्हणाले,

" पण हं काय ? याचं डोकं काय असं लांबट अन् निमुळतं ? "

हा प्रश्न पलीकडे 'टेम्परेचर' घेत असलेल्या परिचारिकेनें ऐकला. ती हंसत म्हणाली,

" सगळ्यांचीं डोकीं जन्मतः अशींच असतात बरं ! पुढें होतात मग सारखीं. आतां दोन दिवसांनींच पहा, मग कळेल. लहान मुलांत दर दिवशीं बदल होत असतो ! "

" असं का ? "

" तर काय ! "

त्या पतिपत्नीकडे पाहून परिचारिका त्यांच्या अज्ञानाला मनांत हंसत होती. एकाहि मुलाला जन्म न देतां लहान मुलांसंबंधीं आपणांस किती सूक्ष्म ज्ञान आहे, हें त्यांना ऐकविण्याचा मोह तिनें कष्टानें आंवरला. तथापि आपल्या अनुभवशीरपणाच्या जाणिवेनें त्यांना धीर येईल असें वाटून कीं काय, " तुम्हांला हें नवीन पण आमचा यांत जन्म गेला ! " येवढें मात्र तिनें त्यांना सांगितलें.

पत्नीला धीर देऊन व बाळाला जपायला सांगून शशिकान्त जायला निघाले, तेव्हां आपल्या फिक्कट गालांवर लज्जेमुळें आलेली आरक्तता लपण्याकरितांच कीं काय, दोन्ही हातांनीं मुख झांकून घेऊन हळूच ती म्हणाली,

" कुमाराला घेऊन यावं गडे, म्हणजे बाळाचं त्याच्याशीं किती साम्य आहे-- "

पत्नी बोलण्यास कचरत असली तरी तिला काय बोलावयाचें आहे तें आपण बरोबर ताडलें आहे हें पत्नीला दर्शविण्याकरितां मिस्किलपणें हंसत ते म्हणाले,

" साम्य पाह्यला कुमारच कशाला पाहिजे? इकडे पहाण्याची तसदी घेतली तरी कळेल तें ! "

त्यांचा थोरला मुलगा कुमार हा हुबेहूब शशिकान्तांसारखा होता. भुंवया उडवून डोळे मिचकावण्याची त्यांना जी संवय होती, ती त्यानें जशीच्या तशीच उचलली होती. आपल्या प्रिय माणसाचें झालें तरी तें व्यंग आपल्या मुलांत उतरूं नये अशी हिराबाईची इच्छा होती; आणि शशिकान्तांनाहि तसेंच वाटत होतें. परंतु त्यांच्या इच्छेला बाजूला सारून कुमाराच्या बाबतींत निसर्गानें आपलें कार्य केलेंच होतें.

हिराबाई म्हणाली,

" जा गडे, तसं म्हणतें का मी? मला त्याला पहावंसं वाटतं. "

शशिकान्तांनीं तें सहास्य मान्य केलें.

दुसऱ्या दिवशीं जेव्हां कुमाराला घेऊन शशिकान्त आले, तेव्हां त्या पति-पत्नींनीं नूतन बालकाचें त्यांच्याशीं कसकसें साम्य आहे हें अजमावण्यांत बराच वेळ घालविला. तरी शेवटीं नाकाडोळ्यांची ठेवण कुमारासारखी आहे कीं आईबापांसारखी आहे, हे प्रश्न वादग्रस्तच राहिले. मात्र केंस व कान कुमारासारखें आहेत या बाबतींत फक्त मतैक्य झालें! आपल्या अव्यंग बाळाला हिराबाई फारच जपत; आणि त्या प्रेमळ मातेच्या हळव्या मनाला ( डॉक्टरच्या ताकिदीमुळें ) परिचारिकाहि फार जपत.

—२—

" हें नाहीं माझं बाळ ! "

नुकतंच स्नान घालून कपड्यांत गुंडाळून जवळ दिलेल्या बाळाला नकारार्थी हस्तस्पर्श करीत व दुसऱ्या हातानें आपल्या अंगांतील झग्याचें दुसरें बटण लावीत हिराबाई म्हणाली,

" हें नाहीं माझं बाळ ! "

आश्चर्यानें 'आं' वासून परिचारिका म्हणाली,

" म्हणजे ?– "

" हें माझं बाळ नाहीं ! माझं बाळ आणून द्या. "

झबलें, नॅपकिन् घालून व केंसावर ब्रश फिरवून आणि तोंडाला पावडर लावून नीट सजविलेल्या त्या अर्भकाकडे निरखून पाहात परिचारिका म्हणाली,

" पहा ना. डावीकडे भांग– मुलगाच आहे ! " कपड्यांत गुरफटून ठेवलेल्या अर्भकांचा वर्ग ओळखण्याकरितां मुलींचा उजवीकडे व मुलांचा डावीकडे भांग पाडण्याची त्या हॉस्पिटलमध्यें रीत होती, तिला उद्देशून परिचारिका म्हणाली,

" मुलगाच आहे. "

" पण माझा नव्हे. "

" कशावरून ? "

" तोंड फिरवतो. "

" कांहींतरीच तुमचं आपलं ! अहो, त्याला भूक नसेल. "

" नसेल कशी ? वेळ झाली ना : "

" लाडक्या 'पेशन्ट'चं कांहींतरीच त्रास देणं– " असें तोंडांत पुटपुटून नंतर मोठ्यानें ती म्हणाली,

" नेऊं ? "

" हं— पण माझं बाळ आधीं आणा. आंघोळ घालतांना बदललं तुम्ही– "

हिराबाईच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. यांकडे दुर्लक्ष करून परिचारिकेनं तें झोपलेलें मूल उचललें आणि " हळवं-हळवं मन म्हणून चढवून ठेवली डॉक्टरांनीं तर फारच तऱ्हातऱ्हा करूं लागली अगदीं ! " असें पुटपुटत आपल्या व्यवसायभगिनींच्या जवळ जाऊन म्हणाली,

" ऐकलं का प्रभाबाई ? त्या लाडक्या पेशन्टचं म्हणे हें मूल नव्हे ! "

" कोण म्हणतं ? "

" अहो तीच !' माझं मूल बदललं' म्हणे. फारच अगदीं– "

वार्डमधील कोणा पेशन्टचें लक्ष आपणाकडे आहे कीं काय हें चौफेर दृष्टि टाकून प्रभाबाई पाहूं लागली; आणि न बोलण्याविषयीं तिला हातानें खूण करून हलक्या आवाजानें म्हणाली, " अग चूप, चूप आधीं ! ती पहा महामाया–सिस्टर–डॉक्टराबरोबर इकडेच येत आहे. तेवढंच पुरे होईल त्यांना !– म्हणतील आमच्या हॉस्पिटलच नांव बद्दू केलं, लौकिक घालवला ! "

परिचारिका चपापून म्हणाली,

" अगबाई ! तीं दोघं 'राउण्ड' वर येताहेत. आतां कसं हो ? अजून इतकीं मुलं न्हाऊं घालायचीं आहेत. ही नऊ नंबर म्हणजे मोठी कटकटच आहे ! हिच्यापायीं इतका वेळ गेला– "

" हं. धर घे, नेऊन ठेव जा पाळण्यांत. "

ती परिचारिका प्रभाबाईच्या आविर्भावाकडे क्षणभर पहात राहिली. नंतर जवळ येणाऱ्या सिस्टरकडे दृष्टि वळवून तडक हिराबाईकडें गेली व हलक्या आवाजांत म्हणाली,

" घ्या तुमचं 'बेबी.' जागं झालं आहे. रडवूं नका. हं. सिस्टर येत आहे."

स्नानानंतर कपडे घालून व पॉवडर लावून नीटनेटकें केलेलें तें अर्भक पुढें ठेवतांच डोळे मिटून आपलें भक्ष्य शोधूं लागलें व मातेनें जवळ घेतांच दुग्धपान करीत तें निद्रावश झालें. दुसऱ्या दिवशीं शशिकान्त आल्यावर म्हणाले,

" बाळ जरा वाळल्यासारख्या कां दिसतो ? त्याला बरं नाहीं कीं काय ?"

" रात्रीं जरा अंग ऊन लागत होत खरं— "

" हं. त्यामुळेंच असेल. आणि नर्स म्हणत होती तेंहि खरं बरं का. त्याची मुद्रा झाल्या दिवसापेक्षां थोडी निराळी दिसते नाहीं ? "

" आं ? " ती आश्चर्यानें उद्गारली.

" कदाचित् एकसारखं पाहून तुझ्या नजरेला फरक येत नसतील— पण बाळ वाळला हें मात्र खरं. "

पलीकडे बाळबाळंतिणींना औषध देत असलेल्या परिचारिकेला हांक मारून हिराबाई म्हणाली—

" बाळ वाळल्यासारखा दिसतो. त्याचं वजन तरी करून पहातां का ? "

परिचारिका मान उडवून हंसत म्हणाली,

" सिस्टरला सांगा. तिनें सांगितलं तर करूं वजन; पण त्याची कांहीं जरूर नाहीं. पहिले तीन दिवस मूल असतंच बाळसेदार; नंतर जरा उतरतं. शिवाय कपड्यांत गुंडाळलेलं होतं ना तीन दिवस ! त्यामुळेंहि आकारानं मोठं वाटलं असेल तुम्हांला. तसा कांहीं अपाय नाहीं त्याला. चांगला 'हेल्दी' आहे ! "

मातापित्यांचें समाधान झालें. त्यानंतर तेथें असेतोंपर्यंत हिराबाई आपल्या बाळाला क्षणभर विसंबली नाहीं.

— ३ —

बाळ वाढून दोन-अडीच वर्षांचा झाला; पण तो आपल्या थोरल्या भावासारखा दिसत नव्हता आणि आईबापासारखाहि दिसत नव्हता. तथापि त्या त्रिवर्गाशीं त्याचें कांहीं बाबतींत साम्य होतें. त्याची नाजुक ठेंगणी चण व गौरवर्ण यांचें आईशीं अधिक साम्य होतें; तर डोळ्यांचें आणि भालप्रदेशाचें बापाशीं साम्य असूनहि ती भुंवया उडविण्याची लकब मात्र भावाप्रमाणें त्यानें उचलली नव्हती. या गोष्टींचें त्या आईबापांना कितीतरी समाधान वाटे! पुष्कळशा चिकित्सेनंतर फक्त कानच कुमारासारखे आहेत असें ठरलें. नाक, ओंठ, जिवणी व हनुवटी आणि एकंदर आंगलट तर अलौकिक सुंदरतेच्या सदरांत पडत होती. त्याच्या सुंदर रूपावरून त्याचें नांव मोहन ठेवण्यांत आलें होतें. त्याच्या त्या मोहून टाकणाऱ्या मनोहर मुखकमलाचे पटापट मुके घेत एकदां त्याची आई पतीकडे प्रेमकटाक्ष फेंकून म्हणाली,

" आपला हा मोहनबाळ मुलगी होऊन कां नाहीं आला बरं? किती असामान्य सुंदर दिसली असती मुलगी! नाहीं? "

पत्नी–पुत्राकडे प्रेमभरानें निरखून पहात ते म्हणाले,

" तसं झालं असतं तर तूं तिला गमावून बसली असतीस– "

पत्नीनें अंग थरारल्यासारखें केलें. तें पाहून ते पुढें म्हणाले,

" म्हणजे एखादा उपटसुंभ, जांवयाच्या नांवानें पुढें आला असता आणि तुझं हें रत्न हिरावून घेऊन गेला असता. समजलं! ईश्वर करतो तें बऱ्याचंच असतं! "

हें ऐकुन हिराबाई हंसूं लागली आणि दोघांनींहि चुंबचूंबून त्या बाळाला अगदीं बेजार केलें. तो त्या त्रिवर्गाचा जीव कीं प्राण होता. आईबापांना तर तो क्षणभर दृष्टिआड असलेला खपत नसे; आणि त्याच्या मोहक रूपाला कोणाची दृष्ट होईल, याविषयीं तर हिराबाई फारच जपत असे.

— ४ —

यथाक्रम बाळ आठ वर्षांचा झाला. परंतु वास्तविक वयापेक्षां तो कमी वयाचा दिसे. त्याची आंगलट, त्याप्रमाणेंच प्रकृति फार नाजूक होती. डॉक्टर आणि शिक्षक यांचा तनखा नेहमीं चालू असे. प्रकृतीचा परिणाम म्हणून कीं काय, वयाच्या मानानें त्याला शिकण्याची गोडी कमी होती. गायनाकडे मात्र ओढा दिसे. परंतु आपला मुलगा गायक व्हावा, अशी त्याच्या आई-बापांची इच्छा नव्हती. याकरितां आधुनिक पद्धतीच्या शिक्षणसाहित्यांनीं— मेकॅनो, अक्षरांचे चित्रपट, चित्रांचे ठोकळे — त्याला शिक्षणाची गोडी लावण्याकरितां शिक्षकाची जरुरीच असे.

या अवधींत हिराबाईवर गरोदरपणाचा प्रसंग दोनदां आला; परंतु पुन्हा मागील प्रकारांची आवृत्ति होऊन प्रसूतीसाठीं हॉस्पिटमध्यें जाण्याचा तिला प्रसंगच आला नाहीं.

तिसऱ्या खेपेस मात्र पुरे दिवस भरून त्याच हॉस्पिटलमध्यें प्रसूतीसाठीं ती आली. प्रसूति निर्विघ्नपणें पार पडल्यावर या दिव्यांतून जाण्याचा निष्फळ प्रसंग वारंवार येऊं नये, याकरितां डॉक्टरच्या सल्ल्यानें शस्त्रक्रिया करण्याचें ठरलें आणि योग्य वेळीं ती करण्यांत आली. यामुळें या खेपेस हॉस्पिटलमध्यें तिचें वास्तव्य अधिक काळ झालें.

आधींच हिराबाई फार हळव्या मनाची होती. त्यांत यापुढें अपत्यलाभ घडणें नाहीं, या तीव्र जाणीवणें ती आपल्या नव्या तान्हुल्याला फारच जपे. कपडे बदलण्यासाठीं किंवा स्नान घालण्यासाठीं परिचारिकांनीं त्याला उचललें कीं, ती हटकून त्यांना ' नीट धरा हो ', ' जपून घ्या हो ', ' फार कढत किंवा कोमट पाणी घालूं नका ', असें प्रत्येक वेळीं सांगे. तिचे असे उद्गार ऐकले म्हणजे कोणी हंसत, कोणी ' कळतंय आम्हांला ' म्हणून उत्तर देत, आणि बिलकूल दुर्लक्ष करीत. असेंच ती एके दिवशीं परिचारिकेला बजावीत असतां ती परिचारिका हंसून म्हणाली,

" पुरे हो हिराबाई तुमचं. असं अति जपण्यानं काय होतं आहे ठाऊक ? "

" काय होतं ? "

" कांहीं तरीच होतं मग ! "

प्रश्नार्थक मुद्रेनें हिराबाई तिच्याकडे पहातच राहिली. जणूं काय प्रश्न केला तर अप्रिय ऐकायला मिळेल असें वाटून तसें करायला ती धजली नाहीं. तिच्या मनांत अकारण हुरहूर सुरू झाली. तिची ती कावरीबावरी मुद्रा पाहून परिचारिका हंसून म्हणाली,

" तसं तुम्हांला नको हो घाबरायला. एका धांदरट बाईची गोष्ट आहे ती. मागें कांहीं वर्षांपूर्वीं प्रभाबाई होत्या ना, त्यांनीं सांगितली होती ती मला. तेव्हां म्हणे अशीच एक बाई आली होती बाळंतपणाला. तिचीं फार मुलं गेल्यामुळं तिचं मन हळवं झालं होतं म्हणे. प्रत्येक वेळीं ती असंच तुमच्या-सारखं मुलाला जपायला सांगायची अन् एके दिवशीं झालं काय ? ' हा नाहीं माझा मुलगा ! ' असं ती म्हणूं लागली. अहो झालं होतं काय ?–प्रभा-बाईनीं सांगितलं हो मला–कीं, तें मूल आलं होतं झोंपेला. आंघोळ घालतांच तें झोंपलं अन् ही बया गेली पाजायला. झोंपेपुढं तें काय पिणार ? तशी म्हणाली ' माझं नाहीं हें. ' इतक्यात डॉक्टर आले ' राउण्ड ' वर; तेव्हां घाईघाईनं प्रभाबाईनीं तें मूल ठेवलं एका झोपलेल्या बाईच्यापुढं अन् तिचं न्हाणून आणलेलं जागं मूल ठेवलं हिच्या पाळण्यांत. जवळजवळ एकाच वेळीं जन्म-लेलीं मुलं होतीं तीं. पुढं जिचं तिच्याजवळ बदलून ठेवणार होत्या प्रभाबाई; पण मग ती बाई आपल्या मुलाला अगदीं विसंबेना अन् रात्रपाळी होती दुसऱ्या नर्सकडे. शेवटीं गेली घेऊन तें दुसरंच मूल झालं ! "

आपल्या तान्ह्या मुलाला घट्ट हृदयाशीं धरीत शहारे आल्यासारखें अंग थरारवून हिराबाई म्हणाली,

किती भयंकर ! ऐकवत नाहीं — "

" अहो, ऐकण्यासारखं तर पुढंच आहे. ती बाई होती चांगली घरंदाज. अन् तिला मूल गेलं नायकिणीचं ! "

" अँः ! अन् तिचं ? "

" तिचं–ती नायकीण गेली टाकून ! "

हिराबाई आश्चर्यानें तिच्याकडे पहातच राहिली. ती पुढें म्हणाली,

" मुलगी असती तर धंद्याला उपयोगी पडली असती. मुलगा घेऊन काय करूं ? असं ती नायकीण म्हणाली हो ! "

" मग ? "

" मग काय ?— सिस्टरनीं पाळलाय तो मुलगा. तुमच्या नजरेस पडला असेल ? सकाळींच दारांचीं पितळी बिजागरं, कडी–कोयंडे ब्रासोनें घांसून चकचकीत करीत असतो तो ! "

" मी नाहीं पाहिला. मला दाखवा हं. केवढा आहे ? "

" असेल आठ-नऊ वर्षांचा– हो, नववं लागलं; पण चांगला बारा वर्षांचा असावा असा दिसतो. उंच, गोरा अन् केंस, कपाळ कसें अगदीं छान आहेत. "

हिराबाईचें डोकें गरगर फिरूं लागलें. विद्युद्वेगानें एक चमत्कारिक चमक तिच्या मस्तकांत शिरली. तिनें गतकालावर चढलेलें विस्मृतीचें आवरण फाडून एक ठळक चित्रपट तिच्या अंतश्चक्षूंपुढें धरला.

" आठ वर्षांपूर्वी ? – अं – माझा बाळ तर— "

मनातल्या मनांतसुद्धां तिला ती कल्पना उच्चारणें सहन होईना. मस्तक गरगर फिरूं लागलें. ऊर धडधडूं लागला. संशयकल्लोळानें फुटण्याच्या बेतास आलेलें डोकें आंगठा आणि तर्जनीनें दाबून धरून घोगऱ्या आवाजानें ती म्हणाली,

" उद्यां मला दाखवा. "

त्या आवाजानें चमकून परिचारिका म्हणाली,

" तुमचा आवाज बदलला हिराबाई ! हा जाग्रणाचा परिणाम. पडसं होईल पहा अशानं– झोंपा लौकर. "

हिराबाईला रात्रभर नीट झोंप लागली नाहीं. सारी रात्र तिनें दारुण तळमळींत काढली. दुसऱ्या दिवसाची ती उत्सुकतेनें वाट पहात होती, तर एकीकडे तो दुष्ट दिवस न उजाडेल तर बरें, असेंहि तिला मनांतून वाटत होतें.

यथाक्रम सूर्योदय झाला आणि हॉस्पिटलमधील यंत्रासारख्या ठराविक कार्यक्रमाला सुरुवातहि झाली. रात्रपाळीच्या परिचारिकेची ' ड्यूटी ' संपल्यामुळें ती घरीं जावयासाठीं बाहेर पडली. हिराबाईला तिच्याकडे पहावेना. एखादी अप्रिय वस्तु दृष्टिआड झाली म्हणजे समाधानानें सुटकेचा निश्वास सोडतात तसा तिनें सोडला. परंतु हें ओढून आणलेलें सुख पुरतें क्षणभरसुद्धां टिकलें नाहीं. ती परिचारिका फाटकांतून परत तिच्याजवळ येऊन हलक्या आवाजांत म्हणाली,

" हिराबाई, रात्रीं मीं सांगितलं होतं ना तुम्हांला, तो मुलगा हा पहा. चर्चेला जायला निघाला होता, पण मीं आणला जरा आग्रह करून. "

हिराबाईनें कुशी वळून भिंतीजवळच्या खिडकींत बाहेरच्या बाजूला उभा असलेल्या त्या मुलाकडे पाहिलें आणि प्रथम दृष्टिपातालाच तिची सारी शक्ति, त्राण, देहमान नाहींसें झालें. वेड्यासारखी ती टकमक त्याच्याकडे पहातच राहिली. तिच्या स्थितीचा उमज न पडून परिचारिका म्हणाली,

" पाहिलेंत ना कसा सुरेख आहे तो ? रविवारीं चर्चेला जाण्यासाठीं हा छान पोशाख केला म्हणजे फारच सुंदर दिसतो; नाहीतर एरवीं पहाल तर, असतो आपला बिजागरं घांशीत. "

तिनें असें म्हणतांच भुंवया उडवून, डोळे मिचकावून व मानेला एक झटका देऊन हंसतच तो पळाला. हिराबाईच्या हृदयांत घुसलेली सुरी तिचें हृदय आणखी खोल कापीत गेली. " हाय रे देवा !– माझाच हा– अगदीं थेट तो चेहरा अन् तीच डोळे मिचकावण्याची लकब– मुळीं शंकाच नको. हाय !– माझं लेंकरूं दवाखान्यांत दारांच्या कड्या-कोयंडे घांसतं, अन् नायकिणीचं पोर आम्हीं फुलासारखं वाढवतों !– काय झालं हें ! झालं कसलं,

मींच केलं. आतां मी तिकडं तोंड कसं दाखवूं ? अन् तिकडं कसं सांगूं ? हाय रे दैवा !– न सांगून तरी कसं चालेल ?– पतीशीं प्रतारणा ? एखाद्या चारित्र्यहीन स्त्रीनें करावी तशी प्रतारणा मजकडून होणार नाहीं. हं, ते डोळे, अन् तांबड्यालाल ओंठावर टोंक मारायला सज्ज झालेल्या राघूच्या चोंचीसारखं निमुळतं बांकदार नाक— आमच्यापैकीं कोणासारखाच तो नसतांना त्याच्या त्या रूपाला मोहून, आम्ही बळेनें त्याचें आमच्याशीं साम्य चिकटवून, आजवर स्वत:ची फसवणूक करून घेतली ना ? – पण आतां पुढें ? – आठ वर्षें खस्ता खाऊन जिव्हाळ्यानें वाढविलेल्या मोहनला दूर तरी कसा लोटूं ? अन् पोटच्या गोळ्याला दास्याच्या कर्दमांत खितपत तरी कसा ठेवूं ? – अरेरे !– निरपराधी बाळा, कोणत्या जन्माचं वैर साधून मोहनच्या जननीनें तुला ह्या परिस्थितींत लोटून दिलं ? तिनं कसलं, मीच ! मींच हें पातक केलं आहे. देवा ! कोणतं प्रायश्चित्त घेऊन या पातकाचं परिमार्जन करूं ? तूंच वाट दाखव; देवा, मला कांहीं समजत नाहीं.

— ५ —

संध्याकाळीं मोहनला घेऊन शशिकांत जेव्हां पत्नीला भेटावयास आले, तेव्हां नेहमींप्रमाणें हास्य-मुखानें त्यांचें स्वागत झालें नाहीं. त्यांच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें धैर्यच तिला होईना. एका हातानें कोटाच्या खांद्याजवळचा भाग झटकीत झटकीत आईजवळ येऊन मोहननें जेव्हां दुसरा हात तिच्या गळ्यांत टाकला, तेव्हां तो स्पर्श तिला दाहक वाटला. मोहन लडिवाळपणें म्हणाला,

" आई ग, तो पहा तिकडे खिडक्यांचीं तावदानं पुसतो आहे ना, त्या पोरानं माझ्या कोटावर केर उडवला. "

त्याची तक्रार थोडक्यांत मिटविण्याच्या उद्देशानें शशिकांत म्हणाले,

" जाऊं दे बाळ, वाईट आहे तो. आपण त्याचं घर उन्हांत बांधूं ! "

तो संवाद ऐकून मोहननें निर्देशिलेल्या दिशेकडे हिराबाईनें दृष्टि वळवून पाहिलं आणि तिला कसेंसेंच झालें.

' कोणाच्या स्थानावर उभा राहून कोणाविषयीं तक्रार करीत आहे हा ! आणि उन्हांत घर बांधायची आतां बाकी आहे काय ? याच्याकरितां त्याला उन्हांतच उभा केला आहे देवानं '—या विचारानें तिचें मस्तक भ्रमण करूं लागलें. मस्तकावरून कढत ओघळ ओघळून त्यायोगें कानशिलें व डोळे भाजून निघत आहेत असें तिला भासूं लागलें. परंतु बिचाऱ्या मोहनला तिच्या या अंतस्थ घडामोडींची काय कल्पना ?

याच वेळीं वात्सल्यपूर्ण हातानें नेहमींप्रमाणें कुरवाळून घेण्याच्या आशेनें हातांचीं कोपरें पलंगावर टेंकवून व आपल्या चिमकुल्या अंजलींत तोंड लपवून बोटांच्या फटींतून आईकडे पहात त्यानें आपलें कुरळ्या दाट केसांनीं आच्छादिलेलें मस्तक तिच्यापुढें सरकवून, लाडक्या आवाजांत तो म्हणाला,

" आई ग, तूं कधीं घरीं येशील ? मला तुझ्याशिवाय करमत नाहीं ग— " बोलतां बोलतां वर उचललेल्या त्या निष्पाप अर्भकाच्या दंवानें भिजलेल्या टवटवीत गुलाबासारख्या मोहक कपोलावर आवेगासरशीं ताड्कन् एक चापटी हिराबाईनें ठेवून दिली ! या अनपेक्षित आघातानें मोहनच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तो रडूं लागला, आणि शशिकान्त स्तंभित झाले. मुलाला कुरवाळीत ते म्हणाले,

" हें काय ? त्याला कां उगाच मारलंस ! "

कांहींच उत्तर न देतां हिराबाई अश्रुमोचन करूं लागली. हा असंबद्ध प्रकार पाहून शशिकान्त आश्चर्यचकित झाले. तिच्या मस्तकावर त्यांनीं हात ठेवून पाहिलें तों तें कढत होतें. लगेच त्यांनीं प्रकृतीबद्दल चौकशी केली, तेव्हां कळलें कीं, " ती रात्रीं लौकर झोंपत नाहीं. जागरणामुळें सकाळपासून तिला 'टेंपरेचर' आहे.

पत्नीला धीर वाटेल असें बोलून व तिची नीट काळजी घ्यायला सांगून कांहीं वेळानें शशिकान्त घरीं गेले. हिराबाईनें ही रात्रहि आलोचन जाग्रण

करून विचारांत घालविली. विचारातिरेकानें मेंदू शिणला; परंतु निश्चित कांहींच ठरलें नाहीं. दुसऱ्या दिवशीं प्रकृति मात्र अधिकच बिघडली. हें प्रमाण दिवसें-दिवस वाढतच चाललें. शेवटीं प्रकृति जास्तच बिघडल्यामुळें 'तान्ह्या मुलाला अपाय करोल' या सबबीवर तें तिच्यापासून दूर करण्यांत आलें. त्यायोगें तर हिराबाईची प्रकृति आटोक्यांत राहिली नाहीं. भ्रमांत 'यालासुद्धां बदलून टाकणार का ?', 'त्याच्यासारखें यालासुद्धां बिजागरं घांसायला लावणार कां ?' असें ती बडबडे. तिची ती बडबड ऐकून ती रात्र-पाळीची परिचारिका आपल्या अगत्याच्या मैत्रिणीला म्हणाली,

" अग, ती प्रभाबाईनीं सांगितलेली गोष्ट मीं हिला सांगितली, तर तेंच घेऊन बसली पहा ! ––"

जखम भरून बरी होत आलेली हिराबाईची प्रकृति एकाएकीं इतकी कशानें बिघडली आणि ती असें असंबद्ध कां बडबडत होती व तिच्या मृत्युला मूळ कारण काय झालें, हें तेथील डॉक्टरना किंवा शशिकांतांना मुळींच कळलें नाहीं.

* * *

दुसऱ्या दिवशीं मोठ्या आशेनें आईला भेटायला आलेल्या मोहननें, तिच्या निर्जीव शवाला कवटाळून जेव्हां केविलवाणें रडून ओरडून हाहाःकार उडवून दिला, तेव्हां तो मुलगा आपलें तावदानें व कडया-कोयंडे स्वच्छ करण्याचें काम क्षणभर थांबवून विस्मयानें त्याच्याकडे पहात राहिला !

---

# टू लेट ! टू लेट ! : : ४

नानासाहेब इतके स्तिमित झाले होते कीं तशा स्थितींत त्यांना त्यांच्या मित्रांनीं पाहिलें असतें तर त्यांचें सर्व शरीर संज्ञाशून्य होत चाललें आहे असेंच त्यांना वाटलें असतें. ते शून्य दृष्टीनें हातांतील मळकट चिठोऱ्याकडे पहात होते. परंतु त्यांतील मजकुराचा अर्थबोध तरी त्यांना होत नव्हता; किंवा जो झाला त्यावर त्यांचा विश्वास बसत नव्हता, असेंच, त्यांनीं डाव्या हातानें आपल्या मस्तकावरील दाट–केंस मुठींत घट्ट पकडून ठेविले होते त्यावरून पहाणाऱ्याला सहज वाटलें असतें. सुदैवानें अशा स्थितींत त्यांना पाहणारें तेथें कोणीच नव्हतें.

त्यांनीं जोरानें केंसावरील आपल्या मुठीची पकड ओढल्यामुळें उलटे वळवलेले दाट–केस पुढें आले, ते मानेच्या झटक्यासरसे मागें सारून त्यांनीं डोळ्यांवरून आपला हात फिरविला; आणि तें चिटोरें आणखी जवळ धरून निरखून पाहिलें त्यावेळीं अस्फुट हुंदक्याबरोबर दोन अश्रुबिंदु त्या चिठोऱ्यावर गळून पडले. नानासाहेबांसारख्या चाळिशी उलटून गेलेल्या उंचापुऱ्या

धिप्पाड पुरुषानें ज्यावर अश्रु ढाळावे असें त्या चिठोऱ्यांत काय होतें बरें ? त्यावर कांपऱ्या हातानें लिहिलेल्या अवघ्या दोनच ओळी होत्या.

" मी मरणाच्या दारीं पडलें आहें. " सुकलेल्या अश्रुबिंदूआड एक शब्द लोपून पुढें अक्षरें होतीं—

" त्यापूर्वी आपले गैरसमज दूर करून क्षमा मागायची आहे. एवढी शेवटची इच्छा पुरवावी. "

तें चिठोरें निनांवी होतें. सही नसली तरी आपली ओळख पटेल ही जणूं चिठी पाठविणाऱ्या त्या व्यक्तीला खात्रीच होती आणि त्या व्यक्तीचा हा आत्मविश्वास अनाठायीं नव्हता हें नानासाहेबांच्या चर्येवरून स्पष्ट ताडतां येण्याजोगें होतें. त्या दोन ओळींच्या चिठोऱ्यानें त्यांच्या वृत्तींत कितीतरी खळबळ उडविली. त्यांच्या दृष्टीपुढें गतकालाचीं किती तरी स्मृति-चित्रें जशींच्या तशीं उभीं केलीं. त्या दृश्य दर्शनांत ते स्वतःला, स्थळ—कालाला क्षणभर अगदीं विसरून गेले. त्यांची ही तंद्री किती वेळ टिकली असती न कळे. परंतु 'शेठ' या संबोधनानें ते दचकले. झोंपेंतून जागे झाल्याप्रमाणें ते धडपडून उठले; आणि बाहेर येऊन पहातात तों चिठी घेऊन येणारा हॉस्पिटलचा चपराशी बाहेर तसाच उभा. त्यांच्या स्तिमित झालेल्या मनोवृत्ति आपापले व्यापार करावयास जणूं काय अद्यापि असमर्थच होत्या. ते हतबुद्धपणें त्याच्याकडे पहातच राहिले. परंतु त्यांच्या स्थितीची तादृश्य जाणीव नसलेला चपराशी गडबडीनें म्हणाला, " येतांव का चिटी देतांव ? बायनं त घेऊन येया सांगितलीन हाय. "

नानासाहेबांनीं तांतडीनें कपडे चढविले आणि ते त्याच्याबरोबर निघाले. ते रस्त्यावर येतांच तेथें उभ्या असलेल्या व्हिक्टोरियावाल्यांपैकीं एकानें आपली गाडी पुढें आणून " शेट आपली गाडी आहे " असें म्हटलें. एकहि शब्द न उच्चारतां ते तींत बसले. " कुठं जायचं ? " या गाडीवानाच्या प्रश्नालाहि चपराश्यानेंच उत्तर दिलें. हॉस्पिटलचें नांव ऐकतांच गाडी भरधांव निघाली.

आपल्या शुष्क ओंठांवरून एकदां कोरडी जीभ फिरवून नानासाहेबांनीं घोगऱ्या आवाजांत चपराश्याला प्रश्न केला—

" कांहीं अपघात झाला आहे काय? कधीं...."

" नायबा. मोप दिस झालं खयानं शिक हायत. " चपराश्याच्या सहजोद्गारानें ते केवढ्यानें तरी दचकले.

" क्षय ? "

व्हिक्टोरियाची गति त्यांना अगदीं मंद वाटली. ' सबूर ' म्हणून गाडी थांबण्यापूर्वीच ते खालीं उतरले. खिशांतून रुपया काढून त्यांनीं गाडीवानाकडे फेकला, व मोडहि न घेतां समोरच्या टॅक्सीला हातानें खुणावून, त्यांच्याकडे वळून येत असलेल्या टॅक्सीकडे तेच धांवत निघाले. त्यांची ती विलक्षण धडपड पाहून चपराश्याला नवल वाटलें. " एवढा अगत्याचा प्राणी आजवर कुठं दडला होता ? " असा आश्चर्योद्गार मनांतल्या मनांत काढल्याशिवाय त्याला रहावलें नाहीं. दोनचार मिनिटांत टॅक्सी हॉस्पिटलच्या आवारांत शिरून पोर्चखालीं उभी राहिली. ताडकन बाहेर उडी मारून नानासाहेब झपाट्यानें हॉस्पिटलच्या पायऱ्या चढूं लागले. चपराश्यानें मूकपणें हस्तनिर्देश करून दाखविलेल्या दिशेकडे ते चालूं लागले. उजव्या बाजूच्या प्रशस्त वार्डांतील प्रथमच दृष्टोत्पत्तीस आलेल्या खाटेवरून स्त्रीरोगी दिसल्याबरोबर ते तडक तेथें जाऊन दारांत थांबले.

एका खाटेवर काष्टवत् झालेले पाय वर बांधून ठेवलेलें एक अर्भक किंचाळत होतें, आणि शेजारींच स्प्रिंगनें उंचावलेल्या खाटेवर अर्धवट बसल्या स्थितींत एक बाई निजली होती. त्यांनीं चौकसपणें सभोंवार पाहिलें. परंतु इच्छित व्यक्ति न आढळल्यामुळें ते मागें वळून पाहूं लागले. पण आतांपर्यंत मार्गदर्शकाचें काम करीत असलेला तो चपराशी त्यांना दिसला नाहीं. त्याला त्याचें वेतन कामाआधींच पावतें झालें होतें. आपण कांहीं वेळ गैरहजर होतों, ही गोष्ट कोणाच्या लक्ष्यांत आली आहे कीं काय हें जाणून घेण्यासाठीं व हाकाटी होण्यापूर्वींच आपण आपल्या कामांत गुंतून रहावें याकरितां तो

मागच्यामागेंच पसार झाला होता. नानासाहेब तसेंच पुढें निघाले तोंच एका खाटेवर पोटाचें ड्रेसिंग होत असलेली स्त्रीरोगी आपलें पांघरून सांवरीत उद्गारली.

" देखो ए आदमी घुस रहा है. "

काम करीत असलेल्या परिचारिकांनीं मागें वळून पाहिलें आणि पुढं येऊन आश्चर्यानें विचारलें.

" कोण ? कोण पाहिजे ? "

क्षणभर काय उत्तर द्यावें हें नानासाहेबांना सुचेना. त्यांची ती गोंधळलेली चर्या पाहून परिचारिका उद्गारली.

" दिसत नाहीं का बायकांचं वार्ड आहे तें. भलत्या वेळीं एकदम आंत कसे शिरलां ? "

नानासाहेब मागें सरत आंवढा गिळून म्हणाले,

" मी भेटायला आलों आहें. मिसेस मोघे इथंच आहेत का ? "

" ही भेटायची वेळ वाटतं ? चला बाहेर व्हा. कोण मिसेस मोघे ? नंबर काय ? "

" नंबर ? नंबर माहित नाहीं. पण– " नानासाहेबांचें हें उत्तर ऐकून वार्डमधील रुग्ण स्त्रिया व उपचारिका हंसून हेटाळणीचे उद्गार काढूं लागल्या. ती परिचारिका भ्रुकुटि वक्र करून रोषपूर्ण स्वरांत म्हणाली—

" चांगले सभ्य गृहस्थ दिसतां कांहीं मॅनर्स तरी ! बायका दिसल्या कीं चालले ! रुग्ण स्त्रियांच्या वार्डांत घुसायलासुद्धां दिक्कत वाटत नाहीं ! अगदींच कसा ताळ टाळलाय या लोकांनीं ! ! "

या अनपेक्षित माऱ्यानें हतबुद्ध होऊन कपाळावरचा घाम पुशीत ते म्हणाले—

' एक्सक्युज मी. आपला गैरसमज होत आहे. मी मिसेस मोघे–मोहिनीबाई मोघे यांना भेटायला आलों आहें. मला त्यांचा कॉटनंबर ठाऊक

नाहीं. [ आठवल्यासारखें करून ] त्या क्षयानें आजारी आहेत. क्षयरोग्यांचें वॉर्ड कुठें आहे ? '

हें ऐकून त्या परिचारिका तोंडाला हातरुमाल लावून हंसू लागल्या. पहिली परिचारिका म्हणाली—

" क्षयरोग्यांचं वॉर्ड ? सांसर्गिक रोग्यांचं वार्ड आहे का इथं ? त्यांना व्हरांड्यांत उघड्यावर ठेवतात. जा तिकडे, नाहींतर सिस्टरला हांक मारीन म्हणजे चांगलं दाखवील. म्हणे मोहिनीबाई ! वाः ! चांगले ! संबंध हॉस्पिटलमध्यें मोहिनी मोघे या नांवाची एक तरी पेशन्ट आहे का ? चांगल्या थापा मारतां ! ए अर्जुन, अरे रामा; मेले गेले तरी कुठं ? अग आया, ए मेतराणी ! "

बिचारे नानासाहेब ! पराकाष्ठेचे खजील झाले. त्यांनीं आपला अधरोष्ठ दांतांखालीं धरला. क्षणभर त्यांना वाटलें कोणी आपली घातुक थट्टा तर केली नाहीं ? छे. पण अक्षर तर तिचेंच ! आपणाकडून न कळत घडलेल्या प्रमादाबद्दल अस्फुट शब्दांत क्षमायाचना करून खरें काय तें पडताळून पहाण्याच्या उद्देशानें ते परत फिरले. तेव्हां हास्याबरोबर " काय मेले पुरुष तरी " असे तुच्छतेनें काढलेले उद्गार त्यांच्या कानीं आले. तेव्हां तापलेल्या तीक्ष्ण सुया एकदम कोणी काळजांत टोंचीत आहे कीं काय अशा वेदना त्यांन झाल्या.

इष्टस्थलीं प्रवेश होण्यास सुलभ मार्ग असतां तो सोडून या मार्गाचा अवलंब आपण केला तरी कसा ? आपली सारासारविचारशक्ति कशी नष्ट झाली ? अशी स्वतःची निर्भत्सना करीत ते परत फिरले आणि दरवाजाजवळ जाऊन अगदीं पद्धतशीर रीतीनें त्यांनीं मुख्य डॉक्टरांजवळ आपला प्रवेश करून घेतला. मिसेस मोघे किंवा मोहिनीबाई मोघे या नांवाची स्त्री तेथें कोणी नसून मिस लीला नांवाची स्त्री मात्र क्षयानें आजारी असून तिचा भरंवसा नाहीं असें डॉक्टरकडून त्यांना समजलें.

अविश्वासाच्या दृष्टीनें सभोंवार पहात धडधडणाऱ्या हृदयानें ते त्या रुग्णस्त्रीच्या कॉटजवळ येऊन उभे राहिले.

" आलांत ! "

आपले काष्ठवत् हात वर उचलून नमस्कार करीत ती रुग्णस्त्री कांपऱ्या स्वरानें म्हणाली. चिरलेल्या बांबूसारखे बारीक हात, जणूं काय त्वचेचें पातळ आवरण फाडून बाहेर पडण्याच्या बेतास आलेलीं तीं मनगटाजवळचीं अर्धा इंच वर उठून दिसणारीं हाडें; हात उचलल्यामुळें कोपरापर्यंत गेलेल्या व तास झिजून मालकिणीप्रमाणेंच कळाहीन झालेल्या सोन्याच्या तीन बांगडया, स्नेहरहित धूसर केसांच्या दोहों बाजूंस असलेल्या दोन वेण्या, विशेषतः तिचें तें पांढरें फटफटीत कपाळ व त्यामुळें तिच्यावर अकारण दृग्गोचर होणारी वैधव्याची अवकळा पाहून त्यांना कसेंसेंच झालें. डोळे त्यांच्याकडे लावून अथांग दृष्टीनें ती त्यांच्याकडे पहात राहिली तेव्हां त्या दृष्टीला दृष्टी भिडविण्याचें धैर्य त्यांना झालें नाहीं. आपली नजर खालीं लावून ते पुढें झाले व हलकेच तिचे हात आपल्या हातीं घेऊन रुद्ध कंठानें म्हणाले,

" मोहिनी, मोहिनी—"

पुढें त्यांच्यानें बोलवेना. त्यांचे ओंठ व हात थरथर कांपत होते. डोळ्यांतून ओघळूं पहाणारे अश्रु ते कष्टानें आवरीत होते; परंतु त्यांची ती स्थिति पाहून मोहिनीच्या डोळ्यांतून घळघळां अश्रु वाहूं लागले. तें दृश्य पाहून डॉक्टर म्हणाले, " बी पेशन्ट, अशानें त्यांना त्रास होईल. बाई तुम्ही शान्त व्हा. नाहीं तर तुमच्या हिताकारितां यांना जायला सांगावें लागेल. " मोहिनीनें आपले अश्रु आवरले. आपण शान्त राहूं असें नानासाहेबांनीं डॉक्टरांना आश्वासन दिलें. तेव्हां ते तेथून निघून गेले.

" आलांत बरं झालं. म्हटलं भेट होती कीं नाहीं. "

" मी केव्हांचा आलों आहें. पण शोध करण्यांत फार वेळ गेला. "

एक दीर्घ निश्वास सोडून ती म्हणाली,

" हो, मी गेलीं दहा वर्षें जुन्या नांवानं वावरतें आहें, चपराशी जाईल याबद्दल खात्री होती, एक सोन्याची बांगडी दिली होती त्याला पण आपण— "

तिनें ध्वनित केलेला अविश्वास त्यांना चांगलाच जाणवला. त्यांनीं तिच्याकडे पाहिलें तेव्हां त्यांच्या नजरेंत प्रतिबिंबित झालेली विव्हलता तिला स्पष्ट दिसली. ती म्हणाली,

" चिठीवर सही नव्हती तेव्हां वाटलं आपण– "

" केव्हांपासून आजारी आहेस? यापूर्वींच कळवायचें कीं नाहीं ! सारी मंडळी कुठें आहेत ? "

" मंडळी ! "

" म्हणजे आई, श्रीकान्त वगैरे सारीं––

" आई चार वर्षांपूर्वींच वारली. सुशी सासरीं असते अन् श्रीकान्ताची परीक्षा झाली, तो उत्तरेकडे नोकरीला आहे. आणि प्रभाकर बॉरवर गेले होते ते परत आलेले ठाऊक नाहीं. " शक्ति नसतांहि शेवटच्या वाक्यांवर जोर देऊन बोलल्यामुळें तिला दम लागला तें पाहून पुढें होऊन तिचे हात मृदुपणें हातीं घेऊन नानासाहेब म्हणाले—

" नको नको. बोलण्याचे श्रम घेऊं नको. काय ही दशा झाली आहे ? "

" न बोलल्यामुळंच— वेळीं न बोलल्यामुळेंच झाली ही दशा. आतां पुष्कळच बोलायचं आहे; पण– पण काय ! शक्तीच नाहीं. "

तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. तें पाहून त्यांच्या हृदयांत तुटल्यासारखें झालें. तिच्या मस्तकाला हलकेंच स्पर्श करून ते म्हणाले,

" असा त्रास करून घेऊं नको. बरं वाटल्यावर आपण सावकाश बोलूं. आधीं मी डॉक्टरांना 'कन्सल्ट' करतों. " त्यांना हातानें थांबवून ती म्हणाली–

' जाऊं नये. आतां कांहीं उपयोग नाहीं. '

' अशी निराश कां होतेस ! आपण हवेवर कोणत्याही हिलस्टेशनला जाऊं. डॉक्टर म्हणतील तर भवालीलासुद्धां जाऊं, अशी निराश होऊं नको. कांहीं झालें तरी मी तुला मरूं देणार नाहीं. '

तिच्या निष्प्रभ ओंठांवर हास्यरेषा उमटली. आणि ती सर्व मुखमंडलावर

पसरली. तिचे डोळे क्षणभर चमकले. तिला एक प्रसंग आठवला. " आपल्या पावित्र्याची परीक्षा देऊन रंजीस आलेल्या सीतेनें जेव्हां शेवटीं आपल्याला पोटांत घेण्याविषयीं पृथ्वीची प्रार्थना केली आणि त्याप्रमाणें पृथ्वीनें सीतेला कवटाळिलें तेव्हां राम असाच आवेशानें धनुष्य सरसावून पृथ्वीला म्हणत होता,

" हां मी तुला सीतेला नेऊं देणार नाहीं. "

त्या प्रसंगाचें राजा रविवर्म्यानें काढलेलें चित्र तिच्या डोळ्यांसमोर उभें राहिलें. त्या चित्रप्रसंगाशीं आपल्यावरील परिस्थितीचें साम्य वाटून तशा स्थितींतहि तिच्या तोंडावर हास्य उमटलें. कित्येक वर्षांत हंसण्याचा प्रसंग तिला आला नव्हता. त्यामुळें व अशक्ततेमुळें तिच्या शिरांना ताण पडून तिला ज्या वेदना जाणवल्या त्या तिला झेंपल्या नाहींत. विकल होऊन ती मिपचित पडली तें पहातांच घाबरून नानासाहेब डॉक्टरकडे तांतडीनें गेले. उपचार झाल्यावर कांहीं वेळानें मोहिनीला जरा बरें वाटलें. तेव्हां हलकेंच मोहिनीला घरीं नेण्याविषयीं नानासाहेबांनीं डॉक्टरांची परवानगी विचारली. तिला नकार मिळतांच ते आवेशानें म्हणाले,

" इथल्यापेक्षां आमचें घर कितीतरी हवेशीर आहे. तुम्ही सांगाल तशी व्यवस्था ठेऊं किंवा सांगाल त्या हवेवर नेऊं. "

" इट्स टू लेट, यू सी. "

नंतर झटकन् मोहिनीकडे दृष्टि वळवून ते शान्तपणें म्हणाले—

" यांना ' ओपन् टु स्काय- ' ठेवलें पाहिजे म्हणून यांची कॉट इथें ठेविली आहे. "

झटकन् पुढें जाणाऱ्या डॉक्टरांच्या पाठीमागून नानासाहेब गेले तेव्हां सहानुभूतिपूर्वक डॉक्टर म्हणाले,

" मला फार वाईट वाटतें सांगायला, पण खरेंच सांगतों, इटिज टू लेट नाउ. त्या बाईनें कित्येक महिने आपली हेल्थ निग्लेक्ट केली आहे. इथें तिला

तिच्या शेजाऱ्यांनीं आणून ठेविली. ती म्हणाली होती आपलें कोणी नाहीं. आतां शाब्दिक सहानुभूतीशिवाय इतर उपाय फुकट आहेत. ''

*    *    *    *

एका आठवड्यानें पुढयांतील कागदावर अश्रु ढाळीत नानासाहेब बसले होते. त्या कागदांवर पुढील मजकूर होता.

" ........ ज्यावेळीं मी सोन्याचा घास खात होतें तेव्हां माझीं लहान भांवडें आणि अनाथ आई अन्नाला महाग झालीं होतीं. ही स्थिति मला प्रभाकरानीं लिहून कळविली तेव्हां आपल्या संमतीशिवाय मी माझ्या बांगड्या मोडून ते रुपये प्रभाकरांकडे भावंडांची व आईची नीट व्यवस्था लावण्याकरितां पाठवून दिले. मला वाटलें माहेरचा दागिना माहेराकरितां खर्च करण्यास हरकत नाहीं. पण आपण जेव्हां बांगड्यांविषयीं विचारलें तेव्हां माझ्यानें माहेरची हीनस्थिति सांगवेना. माझ्या मौनाचा अर्थ आपण भलताच केला. प्रभाकरांच्या पावतीनें आपल्या शंकेला दुजोरा मिळाला. रागानें आपण मजवर भलभलते आरोप केले. त्यावेळीं सर्व परिस्थिति—माझ्या शिक्षणासाठीं व आपल्यासारख्यांच्या पदरीं बांधण्यासाठीं वडिलांनीं आवाक्याबाहेर केलेला खर्च व त्यामुळें त्यांच्या पश्चात् आईभावंडांना आलेली निकृष्ट स्थिति व ती दूर करण्याकरितां अंशतः तरी हातभार लावणें कर्तव्य आहे असें मला वाटलें. ही माझी मनःस्थिति मी आपणांस वेळींच समजावून सांगायला पाहिजे होती व तसें मी आपण सौम्यपणें वागतां तर केलेंहि असतें. पण प्रभाकरांनीं एके काळीं मागणी घातली होती एवढ्याच गोष्टीला प्राधान्य देऊन आपण मजवर केलेले वृथा आरोप मला अगदीं असह्य झाले. नुकतीच मी स्वातंत्र्याच्या वातावरणांतून विवाहबंधनांत पडलें होतें. मलाहि पोंच राहिला नाहीं. मी आईकडे गेलें. वाटलें मी मुलगा असतें तर भावंडांचीं जबाबदारी मजवरच पडली नसती का ? मजवर जो खर्च झाला तो वांचता तर त्यांचा अशी स्थिति तरी कां होती ? असे निरनिराळे विचारतरंग आले व त्यांची कल्पना आपणांस न देतांच मी घर सोडलें. लोकनिंदेचे तीव्र प्रहार सहन करून मी

नोकरी केली व भावंडांविषयींचें माझें कर्तव्य मी बजावलें. पण—

आपणांविषयींचें माझें कर्तव्य मात्र मी चुकलें ! हें आतां सांगण्यांत काय तात्पर्य आहे म्हणा-पण अंतीं केलेला हा खुलासा वाचून आपण मजवर केलेले आरोप निरर्थक होते एवढें जरी आपणांस पटलें तरी माझ्या आत्म्याला शान्ति मिळेल. ”

नानासाहेब दीर्घ निश्वास टाकून उद्गारले–

“ मोहिनी, मोह्निनी; तूं खुलासा केलास पण किती उशिरां ! टू लेट ! टू लेट ! ”

---

# एक कोडें : : ५

भय्यासाहेब जहागीरदारांच्या वाड्यांत झाडून साऱ्या आश्रित स्त्रियांची गर्दी जमली होती. आज पद्‌मावतीबाईसाहेब आपल्या बाळाला घेऊन घरीं आल्या होत्या. बाळबाळंतिणीला बघण्याकरितां व नवीन बालकाला औक्षण करण्याकरितां हा आश्रित स्त्रियांचा मेळा जमला होता.

चौरंगावर हिरवीशाल आंथरून तीवर गव्हांचा चौक काढला होता. ओटींत नारळ व हातांत पानाचा विडासुपारी घेऊन पद्‌मावतीबाईसाहेब त्यावर येऊन बसतांच नवबालकाला हलकेंच त्यांच्या मांडीवर ठेवण्यांत आलें. नंतर एक एक आश्रित स्त्री पुढें येऊन त्याला औक्षण करूं लागली.

" हारळी सारखे वेली जा, आन्‌ कापसासारखे म्हातारे व्हा. " " हारळी सारखे वेली जा, अन्‌ कापसावानी म्हत्तारें व्हा ! आवुक्षवान व्हा ! "

आपल्या कानशिलांवर काडकन्‌ बोटें मोडीत एक वृद्धा शेवटीं सद्‌गदित स्वरानें म्हणाली.

चांदीच्या ताटांत ठेवलेल्या हिरव्या हरळींतून एक मुळी घेऊन एकदां

तिचा व एकदां पांढऱ्या शुभ्र कापसाचा बालकाच्या मस्तकाला स्पर्श करून जमलेल्या बाया तोंडानें म्हणत,

" हारळी सारखे वेली जा; अन् कापसासारखे म्हातारे व्हा ! "

असला विधि पद्मावतीनें कधींच पाहिला नव्हता. त्यामुळें दुर्वांकुरानें आपल्या तान्हुल्याला दुखापत तर होणार नाहीं या शंकेनें प्रथम ती घाबरली होती. बाळावर जरा वांकून तिनें त्याला हृदयाजवळ जरा ओढून धरलें आणि " काय करतां हें ? " असा प्रश्न विचारणार इतक्यांत त्या स्त्रियांची कृति सुरू झाली व शब्द कानीं पडले. ते ऐकून त्यांचा अर्थ ध्यानीं येतांच तिची भीति नाहींशी झाली. आपलें बाळ वांचून आयुष्यमान् व्हावें, त्याची शिरोभूषणें कापसासारखीं शुभ्र होतील इतकें त्याला दीर्घायुष्य लाभावें व तो निर्मल कापसासारखाच विमल यश व्हावा; आपल्या ह्या वंशाधाराचा वेलविस्तार या हरळीसारखा खोल, विपुल, सुदृढ व अमर व्हावा अशी सदिच्छा व्यक्त करण्याचा ह्या कृतींत व उक्तींत हेतू आहे हें लक्ष्यांत येताच तिचें हृदय आनंदातिशयानें व वात्सल्यानें भरून आलें. तिच्या नेत्रांत आनंदाश्रु चमकूं लागले. ती मनांत म्हणाली,

" खरेंच खेडेगांवांतलीं गांवढळ माणसे, पण किती प्रेमळ आहेत ! या साऱ्यांचा हार्दिक आशीर्वाद होता म्हणूनच आपला हा बाळ वांचला. नाहीं तर सातव्या महिन्यांत जन्मलेलें मूल आणि तशांत आईवेगळें ठेवलेलें असें वांचणें म्हणजे कठीणच. दोन महिने आपण बाळाला घेऊं शकत नव्हतों. आई असून आईशिवायच दुसऱ्या स्त्रीच्या दुधावर वाढलें तें ईश्वराची कृपा अन् या साऱ्यांचा हार्दिक आशीर्वाद लाभला म्हणूनच. नाहींतर ?

तिचें हृदय कंपित झालें. इतक्यांत जवळच बसलेल्या दिवाणजीच्या पत्नीनें अदबीनें हळूच सांगितलें,

" बाईसाहेब, आतां यांतला एकएक खण या हेलकरणींना द्यावा. "

" हेलकरणी ? "

पद्मावती आश्चर्यानें म्हणाली.

" हेलकरणी म्हणजे ? "

जवळच बसलेली एक नातेवाईक स्त्री पोक्तपणाच्या आविर्भावानें म्हणाली,

" होय तर, त्यांचाच तर आज मोठा मान आहे. आपण तिकडे दवाखान्यांत होता, पण बारा दिवस त्यांनीं इथं हेल घातले. त्यांना आज चोळी-बांगडी करायलाच हवी. "

पद्मावती चांगली सुशिक्षित होती. पण इतकें विस्तृत विवेचन ऐकूनहि त्याचा अर्थ तिच्या ध्यानांत आला नाहीं. तिची भांबावलेली मुद्रा पाहून एक चुणचुणीत पोर तिच्या कानांजवळ कुजबुजली,

" किनई वैनीसाहेब, तुम्ही बाळंत होतांना तिकडे, तेव्हां या बायका इथं वाड्याच्या दारांत दररोज पाणी शिंपीत. अन् न्हाणीघरांतहि पाणी भरीत, म्हणून आज यांचा भाव. " एकीकडे कासारीण बांगडया भरीत होती. बांगडया भरून झाल्यावर प्रत्येक स्त्री पद्मावतीजवळ येऊन खणनारळ घेऊन जात होती. वास्तविक बाळ जन्मून आज अडीच महिने झाले होते. पण सुहेर सरल्यानंतरचे सोहाळे आतांच सुरू झाले होते. सातव्या महिन्यांत पद्मावतीची प्रकृति एकाएकीं बिघडली त्यामुळें चंद्रपूरच्या हॉस्पिटलमध्यें जावें लागलें. अपुऱ्या महिन्यांचें मूल जन्मल्यामुळें त्याच्या विशेष उपचारासाठीं व पद्मावतीच्या प्रकृतीसाठीं तेथें अडीच महिने वास्तव्य करावें लागलें. तेथून आपल्या गांवीं आल्यानंतर कुलाचाराप्रमाणें करावयाचे सर्व विधि आतां सुरू होते.

दुसऱ्याच दिवशीं चांगला दिवस असल्यामुळें बारशाचा समारंभहि मोठया थाटाचा झाला. वाड्याच्या दाराशीं व बाळंतिणीच्या खोलीच्या दाराशींहि मोठया लेंकुरवाळया केळींचे खांब लावून पानांच्या कमानी करण्यांत आल्या होत्या. हें जेव्हां पद्मावतीनें पाहिलें तेव्हां तिला कसेंसेंच वाटलें. ती म्हणाली,

"केळींचे खांब लावायचेच तर न पसवलेल्या केळी कापायच्या होत्या—"

तिच्या सासूबाई म्हणाल्या,

" अशा शुभ दिवशीं होतांहोईतों वांझोट्या केळीचे खांब लावीत नाहींत. लेंकुरवाळ्या केळींचेच लावतात. " पद्मावतीचें हृदय वात्सल्यानें आर्द्र झालेलें

होतें. तिला ही कल्पना कशीशीच वाटली. एकदां अपत्यवती झाली कीं केळीचें आयुष्य संपतें. आयुष्यांतील अशा परमोच्च स्थितीचें सौख्य पुरतें अनुभवण्यापूर्वींच तिला तोडायचें ही कल्पना अतिशय निर्दयपणाची—अशुभच—वाटली. आपला बाळ जन्मला तेव्हां आपली प्रकृति फार बिघडली होती. त्यांतच आपलें कांहीं बरें वाईट होतें तर आजचा आनंद अनुभवावयास मिळाला असतां कां ? आपल्या आशा अपुऱ्याच राहिल्या नसत्या का ? आपल्या जिवाला किती यातना झाल्या असत्या ? वनस्पतीला सुद्धां जीव असतो. सुखदुःखाची जाणीव असते हें तत्त्व माणसांना अजून पटलेलेंच नाहीं. नाहींतर आपल्या आनंदांत भर घालण्यासाठीं अशा अशुभ गोष्टी शुभ म्हणून त्यांनीं केल्याच नसत्या.

पद्मावतीचें विचारचक्र याप्रमाणें कितीतरी वेळ सारखें फिरत होतें, आणि पुढेंहि तें फिरत राहिलें असतें; पण तितक्यांत भय्यासाहेब आल्यानें तें थांबलें. त्यांच्याकडे सस्मित पहात ती म्हणाली,

‘ पहावं, पाळण्यांतून दोन डोळे आपल्याकडेच लागले आहेत ! ’

‘ आहे खरं. आतां आमच्यावर चार डोळ्यांची चौकी बसली म्हणायची ! ’

हंसत हंसत पद्मावतीनें बाळाला पाळण्यांतून काढलें आणि त्याचें हलकेच चुंबन घेऊन त्याला पतीपुढें धरून म्हणाली,

‘ पहा, आपल्याकडे यायचं म्हणतोय ! ’

त्यांनीं हळूच हात पुढें केले, परंतु ते थरथरत असल्यासारखे पद्मावतीला भासलें. तिनें चिन्ताकुल स्वरानें विचारलें,

‘ कां ! बरं वाटत नाहीं कीं काय ?

‘ नाहीं विशेष नाहीं कांहीं. ’

‘ म्हणजे ? थोडं तरी पण काय होतंय ! ’

बाळाच्या मुखावर वांकून ते म्हणाले,

‘ कांहीं नाहीं म्हटलं ना ! उगीच काय एकसारखं ? ’

स्वरांतील तीक्ष्णत्व पद्मावतीला बरेंच जाणवलें. तिच्या तोंडावरील हास्य चटकन् मावळलें. तें पाहून भय्यासाहेब म्हणाले,

‘ खरंच तसं मला कांहींच होत नाहीं. जरा मनाला– ’

‘ तेंच मी म्हणतें तें तेंच.’

पद्मावती आवेशानें पुढें म्हणाली,

‘ मी बाळंत झाल्यापासून पहातें. कांहीं तरी मनालाच होतं आहे. पूर्वींची आनंदी वृत्ति नाहीं म्हटलं तरी कमी झाली आहे खास ! विचारीन विचारीन म्हणत होतें पण मलाच बरं नव्हतं. पण आतां तरी सांगावं. ’

‘ छे बुवा !

मोकळेपणानें हंसण्याचा प्रयत्न करीत ते म्हणाले,

‘ छे बुवा ! तुम्हीं बायका म्हणजे अगदीं— ’

‘ डिटेक्टिव्ह ! ’

त्यांचें वाक्य आपणच पुरें करीत पद्मावती हंसत हंसत म्हणाली,

‘ खरंच ना ? बरं तें असो. पण सांगावंना, खरंच काय होतंय आपल्याला ? ’

पत्नीच्या प्रथमोद्गारानें तें चांगलेच चमकले. भयचकीत दृष्टीनें त्यांनीं तिच्याकडे झटक्न पाहिलें. परंतु तिची हास्ययुक्त प्रेमळ मुद्रा पाहून व शब्दांतील कळकळ प्रतीत होऊन त्यांचें कंपयुक्त हृदय स्थिरावलें. किंचित् घोगऱ्या आवाजानें ते म्हणाले, ‘ जरा मनाला त्रास झाला होता– ’

‘ कसला ? ’

‘ एक मुलगी– ’

जपून शब्दोच्चार करीत ते म्हणाले,

‘ एका तरुण मुलीवर नुकत्याच जन्मलेल्या मुलाला मारण्याचा प्रयत्न केल्याचा आरोप होता– ’

अंग शहारल्यासारखें करून व आपल्या मुलाला हृदयाशीं घट्ट धरून ती म्हणाली,

‘ आईग, कसा बाई जीव धजतो तरी पोटचीं पोरं मारायला ! ’

भय्यासाहेब कांहींच बोलले नाहींत. पतीच्या मृदु मनाला त्या घटनेमुळें किती वाईट वाटलें हें त्यांऱ्या चर्येवरून पद्मावतीला चांगलेंच पटलें. त्यांचा परोपकारी व हळवा स्वभाव, पापभीरुत्व व अन्यायाविषयीं चीड आणि स्त्रीदाक्षिण्य हीं तिच्या डोळ्यांसमोर होतींच, आदरयुक्त दृष्टीनें त्यांच्याकडे पहात ती म्हणाली,

‘ आपण होतां ना ? मग तिच्याबद्दल सहानुभूतिपूर्वक निर्णय झालाच असेल ? ’

‘ हो, तिचं म्हणणं मुलाला मारायचा आपला उद्देश नव्हता. देवळांत ठेवून द्यायचा होता. मूल जिवंत आहे. तिला ताकीद देऊन सोडून दिली. ’

पतीकडे धन्यतादर्शक दृष्टीनें पहात ती म्हणाली,

‘ बरं केलं. खरं म्हणजे बायकांना अशा स्थितीला नेणाऱ्या पुरुषांनाच शिक्षा व्हायला हवी. पण ते होतात नामानिराळे अन् बिचाऱ्या तेवढ्या सांपडतात अचूक ! तो सांपडला कां ? कोण होता तो ? ’

‘ नाहीं. त्याचं नांव सांगायचं तिनं नाकारलं. ’

‘ पहा, एवढा प्रसंग आला तरी त्याला वाचवायची धडपड ! अन् तो—खरोखर इतकं निस्सीम प्रेम करणारी स्त्री पोटच्या गोळ्याचा गळा दाबण्याइतकी दुष्ट असेल असं आपल्याला वाटतं कां ? अशा प्रेमळ पोरीला पाषाणहृदयी करण्याचं सारं श्रेय त्या माणसाकडे आहे. बिचारी ! असहाय स्थितींत जगाच्या माऱ्याला एकटी कशी तोंड देणार ? तेव्हां—’

ते कांहींच बोलले नाहींत. उत्तराच्या अपेक्षेनें क्षणभर थांबून पुढें तीच म्हणाली,

“ खरोखर अस्सा राग येतो अशा माणसाचा–शोधून चांगली शिक्षा करावी — ”

त्यांच्या तोंडून एक दीर्घ निश्वासयुक्त उद्गार निघाला. तिनें झटकन त्यांच्या मुद्रेकडे पाहिलें, दोघांची दृष्टादृष्ट होतांच भय्यासाहेबांनीं आपली दृष्टि

चटकन् खालीं वळविली. तरी त्यांच्या नजरेंतील विव्हलतेची छाया तिला दिसल्याशिवाय राहिली नाहीं. त्या दृष्टीनें उत्तेजित होऊन ती म्हणाली,

" अशक्य नाहीं कांहीं. अशा मुलींनीं तोंड उघडून आपल्याला नाडणाऱ्याचं नांव सांगितलं तर अशक्य नाहीं. आयुष्याची सर्वस्वीं माती करणाऱ्याबद्दल या पोरी एवढा पक्षपात तरी कशाला करतात म्हणतें मी ? पहा आतां, या पोरीला आप्तेष्ट नीट वागवणार नाहींत, समाज नीट वागवणार नाहीं. जरा बरं बघणार नाहीं. अशा स्थितींत पोटासाठीं, पोरासाठीं यापुढें तिला — अरेरे, अशा तऱ्हेनें पतित स्त्रियांचा वर्ग तयार होतो. आपल्या क्षणिक सुखासाठीं स्त्रियांच्या आयुष्याची अशी आहुती घेण्याकरितां स्त्रियांनीं एवढं अगत्य कां दाखवावं कळत नाहीं ! "

भय्यासाहेबांनीं पुन्हां एक दीर्घ उच्छ्वास टाकला ! ते उठून उभे राहिले. त्यांच्या डोळ्यांच्या कडा आर्द्र झालेल्या होत्या. ओंठ घट्ट मिटलेले होते आणि चेहेऱ्यावर उद्विग्नता पसरलेली होती. पतीच्या अशा मुद्रेकडे पाहून पद्मावतीला खरेंखुरें समाधान वाटलें. अप्रिय वाटणाऱ्या विषयाबद्दलचा निषेध, मौन स्वीकारून व्यक्त करण्याची त्यांची संवय तिला माहीत होती. आज त्यांनीं एकसारखें मौन धरलें होतें. त्यामुळें या गोष्टीची त्यांना किती चीड आली आहे हें तिला चांगलेंच कळून आलें ! त्यांच्याविषयीं तिला अभिमान वाटला. आदरयुक्त दृष्टीनें त्यांच्याकडे पहात ती म्हणाली,

" इतकं लावून घेऊं नये गडे मनाला. आपल्या हातीं असेल तितकं आपण चांगलं करावं. आज आपण होतां कोर्टांत म्हणूनच सुटली ना ती ? मी सुद्धां तिचा परामर्ष घेईन. अशा संकटग्रस्त स्त्रियांना माझ्याकडून होईल तें साह्य मी करीन. "

नंतर ती मनांत म्हणाली,

" आजचं इकडचं पुण्यकृत्य देवाघरीं रुजूं झाल्याशिवाय रहाणार नाहीं ! कसा झाला तरी तो अनाथ आईनं दिलेला आशीर्वाद ! त्याचं पाठबळ माझ्या बाळाला लाभो म्हणजे झालं ! "

आपल्या भाबड्या भावनेला भय्यासाहेब हंसतील या भीतीनें ती आपले शेवटचे विचार उघड उच्चारूं शकली नाहीं.

* * *

भय्यासाहेब हे साधारण स्थितींतील कुटुंबांत जन्मले होते. तरी बुद्धीनें चलाख असून त्यांचे विचार उच्च दर्जाचे असत. ' सामाजिक व धार्मिक गुलामगिरी नष्ट झाल्याशिवाय देशाचें नष्टचर्य संपणार नाहीं. जातिभेद मोडला पाहिजे, सामाजिक उच्च-नीचता नाहींशी झाली पाहिजे, ' इत्यादि विचार आपल्या कॉलेजांतील सहाध्यायांजवळ ते मोठ्या आवेशानें बोलून दाखवीत. आपलें शिक्षण पूर्ण झाल्यानंतर यांपैकीं शक्य ती चळवळ हातीं घेऊन तींत सुधारणा करून दाखविण्याचे बेत ते जेव्हां बोलून दाखवींत-तेव्हां त्यांचे सहाध्यायी हंसून म्हणत,

" सुधारणेचा एवढा पान्हा कां फुटला आहे तें आम्हांला ठाऊक आहे. मोठमोठे बेत कशाला पाहिजेत ? त्या कांहीं तोंडच्या गोष्टी नाहींत, त्यांना पैशाचं पाठबळ लागतं. एकच गोष्ट तुला सोपी आहे. पतितोद्धार कर ! त्या मूरगांवकरशीं लग्न करून दाखव ! म्हणजे मोठा सुधारक म्हणून तुझा बोल-बाला झटपट होईल ! "

चांगल्या विचारांना नुसता शाब्दिक पाठिंबासुद्धां मिळूं नये, याचें त्यांना वाईट वाटे. कॉलेजांत नुकतीच दाखल झालेली- मूरगांवकर इच्याशीं आपली कुठें थोडीशी ओळख झाली ती यांना खपूं नये अं ? त्यासंबंधानें यांनीं असे कुत्सित उद्‌गार काढावे ! आणि अधिक दुःखदायक गोष्ट म्हणजे आपल्या गरिबीच्या परिस्थितीची अशी हंसून हेटाळणी करावी याचें त्यांना फार वाईट वाटे. परंतु भय्यासाहेबांची अशी हंसून हेटाळणी केल्याबद्दल एके दिवशीं त्यांच्या मित्रांनाच वाईट वाटून घेण्याची पाळी आली. बी. ए. ची परीक्षा झाल्यावर घरीं गेले असतां भय्यासाहेबांचा अनपेक्षितपणें मोठा भाग्योदय झाल्याची बातमी त्यांच्या मित्रांना समजली. भय्यासाहेबांच्या दूरच्या नात्यांतील चुल-तीचा वारसा त्यांना मिळून ' भय्या ' या साध्या नांवापुढें ' साहेब ' अशी

बहुमानदर्शक नामाची उपाधि लागली. कारण ते पदमपूरचे मालक जहागीरदार—बनले. सर्वांबरोबर श्यामालाहि ही बातमी समजली. ती बातमी ऐकून तिला काय वाटलें हें कोणालाहि समजलें नाहीं. कारण तिनें आपला आनंद अथवा उद्वेग कांहींच कोणाजवळ प्रकट केल्याशिवाय एकाएकीं कॉलेज सोडलें ! भय्यासाहेबांच्या सहाध्यायांना वाटलें भय्यासाहेबांशीं विवाहबद्ध होण्याकरितांच तिनें एवढया तांतडीनें कॉलेज सोडलें असावें. परंतु वस्तुस्थिति तशी नव्हती.

भय्यासाहेबांना प्राप्त झालेल्या उच्च इतमामाप्रमाणेंच त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाला वळण लागत होतें. दुःखें ज्याप्रमाणे एकएकटीं येत नाहींत त्याप्रमाणेंच सुखांचेंहि आहे. मनुष्याचा भाग्योदय एकदां व्हायला लागला म्हणजे तो अनेक परींनीं होतो. भय्यासाहेबांना भाग्यलक्ष्मीबरोबर गृहलक्ष्मीनेंहि माळ घातली. ज्या चुलतीनें त्यांना दत्तक घेतलें तिनेंच त्यांच्याकरितां एका चांगल्या सुशिक्षित कुटुंबांतील सुविद्य तरुणी मुक्रर करून ठेविली होती, तिच्याबरोबर मोठया थाटानें त्यांचा विवाह लावून दिला !

या अनपेक्षित गोष्टी इतक्या झटकन् घडल्या कीं त्या बाबतींत आपलें व्यक्तिशः इष्टानिष्ट मत व्यक्त करावयास भय्यासाहेबांना अवसरच सांपडला नाहीं; किंवा इष्टानिष्ट मत व्यक्त करणेंच एका दृष्टीनें अनिष्ट ठरलें असतें, अशीच वस्तुस्थिति होती. साऱ्या गोष्टी त्यांच्या नवीन आईनें त्यांच्या आई-बापांच्या सहकार्यानेंच आपुलकीच्या भावनेनें आपल्या हातीं घेतल्या होत्या, आणि तिची निवडहि सर्वथैव उत्कृष्टच होती. पद्मावती ही भय्यासाहेबांना इतकी अनुरूप वधू होती कीं तिच्यांत खोड काढायला मुळींच जागा नव्हती. थोडक्यांत म्हणजे पद्मावती आणि भय्यासाहेब हें एक आदर्श जोडपें होतें. त्यांनीं अल्पावधींतच आपल्या जहागिरीची व्यवस्था नमुनेदार ठेविली होती. कुळांच्या सुखसोयी ते स्वतः पहात. दोघांनाहि सार्वजनिक कामाची फार आवड होती. गांवांत त्यांनीं अनेक सुधारणा केल्या होत्या. अनेक संस्थांना पुरस्कार दिले होते. हें लक्ष्यांत घेऊन सरकारनेंहि अशा लायक माणसाला त्या प्रांतां-

तील ऑनररी मॅजिस्ट्रेटचे अधिकार देऊन त्यांचा गौरव केला होता आणि शेवटीं विवाहानंतर वर्षाच्या आंतच बाळाच्या रूपानें ईश्वरानें आपला आशीर्वाद पाठवून त्यांच्या भाग्यमंदिरावर कळस चढविला.

× × × ×

" सार्वजनिक कामें करणारांना बरेवाईट प्रसंग पाहावयाला मिळावयाचेच. आपल्या हातून होईल तितकं दुसऱ्याचं दुःख हलकं करावं, पण दुसऱ्याचं दुःख मनाला लावून घेऊं नये " असें पद्मावती सांगत असतांहि, त्या मुलीच्या प्रसंगानें भय्यासाहेबांना कांहीं दिवस तरी उदासीनता आली होती. त्यांच्या दृष्टीपुढें एक सुन्दर, निष्पाप मुलीचें मुखमंडल उभें राही. तिचे डोळे हंसरे, चंचल खेळकर दिसत. क्षणांत हंसरे, क्षणांत बावरे असें त्यांत विलक्षण परिवर्तन होतांना दिसे. पहातां पहातां ते करुण आणि शेवटीं कठोर दिसत. त्यांचे शेवटचे भेदक तीव्र शर विलक्षण दाहक भासत. त्या मुलीचें मुखमंडल आणि त्याभोंवतीं एवढा इतिहास त्यांच्या कल्पनेला दिसे. त्यामुळें त्यांचें दयार्द्र हृदय व्याकुळ होई. त्यांच्या अभिन्नहृदय पत्नीला पतीची ही उदासीनता प्रतीत झाल्याशिवाय रहात नसे. वर उल्लेखिल्याप्रमाणें ती पतीचें सान्त्वन करी. त्यामुळेंच या गोष्टीला विस्मृतीच्या पडद्याआड जायला वेळ लागला नाहीं.

भय्यासाहेब व पद्मावती हीं दोघें आपल्या सौजन्यानें व परोपकारी वागणुकीमुळें इतकीं लोकप्रिय झालीं होतीं कीं, कोठें येतां जातां त्यांचा मुक्काम एखाद्या तालुक्याच्या गांवीं झाला, तर तेथील शाळा वगैरे संस्थांचे चालक आग्रहानें त्यांना आपली संस्था पाहण्यास निमंत्रण करीत. चंद्रपूरसारख्या जिल्ह्याच्या ठिकाणीं तर पहाण्यासारख्या पुष्कळच गोष्टी होत्या. शिक्षणविषयक निरनिराळ्या संस्था पाहिल्यानंतर तेथील प्रसिद्ध रुग्णालयासहि त्यांनीं भेट दिली. प्रसिद्ध भय्यासाहेब जहागीरदार सपत्निक भेट देणार म्हणून हॉस्पिटलमध्यें जरा गडबड उडाली होती. रोग्यांचे कपडे बदलण्यांत आले होते. स्त्रीरोग्यांची तर विशेषच काळजी घेण्यांत आली होती. त्यांचे केस विंचरून कपडे वगैरेंची चांगली व्यवस्था ठेविली होती. ठरल्यावेळीं पत्नीसह भय्यासाहेब

आले. रुग्णांना देण्याकरितां फळांची मोठी करंडी त्यांनीं बरोबर आणली होती. प्रथम मुलांचा विभाग पाहून त्यांना फळें दिलीं. नंतर स्त्री–डॉक्टरसह पद्मावती स्त्रियांच्या विभागांत गेली.

‘ ही अमुक रोगानें आजारी आहे ’ ही ‘ अशा तऱ्हेनें आली. ’ ‘ ही अमुक ठिकाणाहून आली ’ आणि ‘ हिच्यावर अमुक प्रयोग चालू असून अमुक फरक दिसतात, ’ इत्यादि माहिती डॉक्टरीणबाई सांगत होत्या. स्वतः पद्मावतीहि रुग्ण स्त्रियांना एकदोन शब्द विचारून सहानुभूति व्यक्त करीत होती. एका खाटेजवळ त्या आल्या तेव्हां एका लहान मुलानें पद्मावतीचें लक्ष वेधून घेतलें. तो तिच्या मुलाएवढाच होता. विशेष हें कीं, तो त्याच्यासारखाच दिसत होता. पद्मावती एकसारखी त्याच्याकडे आश्चर्यानें पहात होती; आणि खाटेवरील रुग्ण स्त्री तिच्याकडे पहात होती. जणूं काय दृष्टि एकाग्र करण्याची दोघींत स्पर्धाच लागली आहे.

शेवटीं पद्मावतीनें प्रश्न केला—

“ कोणाचा मुलगा हा ? ”

डॉक्टरीणबाईनीं रुग्ण स्त्रीकडे अंगुलि निर्देश केला. पद्मावतीनें त्या स्त्रीकडे पाहून प्रश्न केला–‘ काय होतं यांना ? मुलगा सारा दिवस जवळच असतो का ? ’

डॉक्टरीणबाईनीं थोडक्यांत उत्तर दिलें,

‘ होय, तिला कोणी नाहीं. ’

रुग्ण स्त्रीच्या डोळ्यांत अग्निस्फुलिंग चमकलें. एक निमिषभर तिची मुद्रा कठोर झाली, नंतर तिच्या डोळ्यांत पाणी आलें; व मुद्रा दीन झाली. डॉक्टरीणबाईनीं पुढें जाण्यासाठीं पाऊल उचललें होतें, परंतु पद्मावती उभीच राहिल्यामुळें त्यांचा निरुपाय झाला. पद्मावती म्हणाली,

‘ वाईट वाटून घेऊं नका. लौकरच बऱ्या व्हाल. ’

‘ बरी होण्यासाठीं मी रडत नाहीं. बाळासाठीं–त्याला कोणी नाहीं. ’

पद्मावती खालीं वांकली. तिनें मुलाच्या डोक्यावरून हात फिरविला. नोकराजवळच्या करंडींतून दोन मोसंबीं त्याच्या हातीं देऊन म्हणाली,

' मुलाची सोय नसेल तर काळजी करण्याचें कारण नाहीं. तुमची इच्छा असेल तर त्याला आमच्याकडे नेऊं. . '

तिच्या डोळ्यांतून आंसवें गळूं लागलीं. ती रुद्धकंठानें म्हणाली,

' ईश्वर तुमचं भलं करो. आणखी एक मागणं आहे ! '

तिला दटावीत डॉक्टरीणबाई म्हणाल्या,

' ए, वेड लागलं का तुला ? कोणापुढं बोलते आहेस ? '

पद्मावती मृदुस्वरानें म्हणाली,

' नको, बोलूं द्या तिला विचारीला. '

नंतर रुग्ण स्त्रीकडे वळून ती म्हणाली,

" काय ? "

' आपला बाळ कुठं आहे ? त्याला एकदां पाह्यचा आहे. ' प्रश्नार्थक मुद्रेनें पद्मावती तिच्याकडे पहातच राहिली. तें पाहून रुग्ण स्त्री म्हणाली,

" हा आणि तो बरोबरीचेच. आपल्या आजारांत त्याला मी पाजीत होतें. "

तिच्याकडे कृतज्ञतेनें पहात पद्मावती म्हणाली,

' असं ? मग तुमचे माझ्यावर फारच उपकार आहेत. जारे मोटारींतून बाळासाहेबांना इकडे घेऊन ये. "

पद्मावतीच्या मुलाला पाहून रुग्ण स्त्रीला परमावधीचें समाधान वाटलें. त्याला पाहून ती आपल्या वेदना, आजार सर्व विसरली. जणूं काय तिला नवचैतन्य प्राप्त झालें ! आवेशानें ती उठून बसली व त्याला घेण्याकरितां आपले कृश बाहू पसरून म्हणाली,

' ये बाळ, एकदां जवळ ये. '

परंतु मुलानें जवळ जाण्याचें नाकारलें. त्यानें तोंड फिरवलेलें पाहून, बाळ-

लेल्या फांद्या काडकन मोडून पडाव्या त्याप्रमाणें तिचे निर्जीव हात खालीं मांडीवर पडले. तें पाहून पद्मावती म्हणाली,

‘ बुजरा आहे तो, अनोळखी माणसाजवळ जात नाहीं. ”

ती रुग्ण स्त्री कॉटवर पडली. जोरानें चाललेल्या श्वासोच्छ्वासावरून तिला बोलण्याच्या व उठण्याच्या श्रमानें थकवा वाटत होता, हें उघड दिसत होतें. तिच्या मनाला बरें वाटावें म्हणून धीराचे दोन शब्द बोलून पद्मावती चालू लागली. तेव्हां ती स्त्री म्हणाली,

“ आतां मी थोड्या दिवसांची सोबतीण आहे, मुलाला आतांच न्यावा, म्हणजे त्याच्यांत जीव अडकून रहाणार नाहीं. त्याची व्यवस्था नीट लागली हें समाधान अंतकाळीं सुख देईल. ”

‘ तुमच्याजवळ तो शेवटपर्यंत राहिला तरी हरकत नाहीं. त्याला आमच्याकडे पोंचविण्याची व्यवस्था मी करून ठेवतें. ’

ती निश्चयानें म्हणाली,

“ नको, त्याची आबाळ होते. ”

“ बरं तर, तुमची मर्जी. ”

पद्मावतीला त्या स्त्रीबद्दल इतकी सहानुभूति व मुलाबद्दल इतका कळवळा व आकर्षण वाटत होतें कीं, त्यामुळें आपल्या ह्या व्यवहाराला वेडेपणा समजून सभोंवतालची मंडळी आश्चर्यानें मनांत हंसत आहेत या गोष्टीकडे तिचें लक्षच गेलें नाहीं. तिनें त्या स्त्रीची विनंति मान्य केली.

भय्यासाहेबांना दुसरीं कामें असल्यामुळें संध्याकाळपर्यंत चंद्रपूरला थांबावयाचें होतें. त्यांचा निरोप घेऊन दोन्ही मुलांसह पद्मावती आपल्या मोटारनें पद्मपुरास आली. बरोबर आणलेल्या मुलाची व्यवस्था तिनें स्वतः एका वेगळ्या खोलींत चांगली लावून दिली. आपल्या मुलाचे जुने कपडे वगैरे तूर्त त्यास देऊन नवीन शिवावयास दिले. नवीन प्रशस्त जागा, प्रसन्न वातावरण, चांगलें खाणेंपिणें व बरोबरीचा सवंगडी यांमुळें नवागत बालकाला फार मौज वाटली. खेळण्याबागडण्यांत त्याचा दिवस मजेंत गेला. रात्रौ त्याची झोंपण्याची

व्यवस्था त्याच्या खास खोलींत केली होती. परंतु एखादें घरटें चुकलेलें पांखरूं जसें आक्रंदून चिवचिवतें तसा तो आपल्याशींच घुसमसत व तळमळत होता. रात्रीं झोंपेंत आईला हांका मारून अस्वस्थपणें किंचाळून उठत होता.

रात्रीं जेव्हां बऱ्याच उशीरानें भय्यासाहेब आले तेव्हां मुलाचें रडें ऐकून ते म्हणाले,

" आज बाळ कां रडत आहे ! त्याला बरं नाहीं कीं काय ? "

" आपला बाळ नव्हे तो. "

पद्मावतीनें सकाळची सर्व हकीगत सांगितली. दोघेंहि त्याला पहाण्याकरितां त्याच्या खोलींत आलीं. पोटाशीं पाय घेऊन व हातांनीं बिछान्यांत चांचपडल्यासारखें करीत तो अस्वस्थपणें झोंपला होता. त्याच्या चेहऱ्यावर दृष्टि जाताच भय्यासाहेब आश्चर्यानें उद्गारले,

" अरे ! आपल्या बाळाशीं किती साम्य आहे ह्या मुलाचं ? आवाजसुद्धां सारखा ? "

" म्हणून तर माझं लक्ष वेधलं, एक प्रकारचं आकर्षण वाटूं लागलं— म्हणून तरी मी आणला त्याला ! "

त्याच्या सोबतीला एका नोकराला तेथें झोंपायला लावून ते गेले.

आणखी आठ दिवस गेले.

एके दिवशीं रात्रीं खोलींतील बिछान्यावर एकाकी झोंपलेल्या मुलाच्या उशाशीं विषण्णपणें भय्यासाहेब बसले होते. त्यांच्या हातांत एक कागद होता व त्यांत पुढील मजकूर होता—

"... ...अकल्पितपणें झालेल्या भाग्योदयाला भुलून माझ्या परिस्थितीचा विचार न करतां तुम्ही माझा विश्वासघात केलात म्हणून मी तुमचा सूड उगविला. तुमच्या पत्नीच्या आजारांत तिच्या मुलाला मधून मधून पाजण्याचें काम—मला दूध अधिक असल्यामुळें—मजकडे येत असे. संधि साधून मी माझ्या बाळाला त्याच्या हक्काच्या जागीं नेऊन निजविलें. मी मुलांची अदलाबदल केली. खोटें वाटेल तर पहा, तुमच्याजवळ असलेल्या माझ्या मुलाच्या डाव्या

दंडावर काळसर रंगाचा डाग आहे. मायलेंकराची तातातूट करण्याइतकी कठोर मला तुम्ही केलीत. कैसानें गळा कापून माझा असा त्याग करूं नका, असें मी परोपरीनीं विनावेलें होतें, पण तुम्हांला द्रव् आला नाहीं. जहागीर-दारीणबाईला आपला विवाह पसंत पडणार नाहीं व तसें झाल्यास कदाचित् जहागिरीलाहि मुकावें लागेल अशा स्वार्थी भीतीनें व विशेषतः वैभवाच्या लालसेनें तुम्हीं माझें प्रेम लाथाडलें. मला माणसांतून उठवून माणुसकीला मुकविलें. माझ्या जीवनांत तुम्ही माती कालविली. त्या तुम्हांला—पण जाऊं दे. तुमच्या पत्नीच्या सौजन्याकडे पाहून व तिचें निर्दोषित्व लक्षांत घेऊन मी तुम्हांला क्षमा केली आहे. माझा बाळ त्याच्या हक्काचा उपभोग घेतांना मी पाहिला. मनाचें समाधान झालें. तुमचा मुलगा तुमच्या पत्नीबरोबर पाठ-विला आहे. कळावें.

—शामा मूरगांवकर

मध्येंच जाग आल्यावर भय्यासाहेब बिछान्यावर नाहींत हें पाहून पद्माव-तीला आश्चर्य वाटलें. पलीकडच्या खोलींत अस्फुट सुस्कारे ऐकल्याचा भास होऊन ती तिकडे गेली.

तों त्या मुलाच्याजवळ भय्यासाहेब सचिंत बसलेले तें पाहून ती आश्चर्यानें म्हणाली,

‘ हें काय ? त्या पोराजवळ आपण कां बसायचं ? रामा कुठं आहे ? ’

तीक्ष्ण शस्त्राप्रमाणें त्यांच्या हृदयाला ते साधे शब्द बोंचले. एकादी लहानशी रक्तवाहिनी तुटून आंतल्यांआंत रक्तस्राव झाल्यानें जशी एकदम अतिशय अशक्तता येते तसें त्यांना झालें. पत्नीला सारें सांगून टाकावें असें त्यांना वाटलें.

‘ पद्मावती, हा आपला—तुझा— मुलगा आहे, ’ असे शब्द अगदीं त्यांच्या तोंडांत घुटमळत होतें. परंतु उच्चार करवत नव्हता. जी गोष्ट कळून आपलें हृदय असें विव्हळ झालें ती गोष्ट आईच्या हृदयाला सहनच होणार नाहीं; तिची वेडयासारखी स्थिति होईल असें मनांत येऊन पत्नीला

संपूर्ण सत्य सांगण्याचें त्यांना धैर्यच होईना. आपल्या परंतु वैभवाच्या या खऱ्या वारसाची परक्याप्रमाणें आबाळ व्हावी हेंहि त्यांच्या मनाला पटेना ! अडखळत शेवटीं ते म्हणाले,

‘ पद्मावती, मला क्षमा कर ! मी– मी अपराधी आहें. हा मुलगा परका नाहीं ! याचा आणि बाळाचा जनक एकच आहे !’

पुन्हां एकदां धीर करून संपूर्ण सत्य तिला सांगून हृदयावरचा भार हलका करावा असें त्यांना वाटलें पण ते बोलूं शकले नाहींत. दोन्हीं हातांनीं तोंड झांकून बाहेर येऊं पहाणारे शब्द अनावर हुंदके जणूं काय दाबून धरीत होते !

दोन्हीहि त्यांचींच मुलें ! पण पद्मावतीच्या पुत्राचा हक्क हिरावला गेल्याचें ज्ञान होतांच त्यांच्या हृदयाला आंतल्याआंत अशा तीव्रतर वेदना होऊं लागल्या. पण श्यामाला त्या वेदना अनुभवण्यास एकाकी सोडतांना त्यांना त्या तशा कां वाटूं नयेत हें एक कोडेंच आहे !

---

## हेमाची निवड : : ६

मालतीबाईच्या घरीं यंदा दिवाळीची तयारी जरा लौकरच सुरू झाली होती. पुण्यास प्लेग वाढत चालल्यामुळें शाळा, कॉलेजे बंद झालीं होतीं आणि तेथें कॉलेजांत शिकत असलेली त्यांची मुलगी हेमावती लौकरच घरीं आली होती. मुलगी असो किंवा मुलगा असो, कॉलेजांत गेल्यामुळें त्याचें महत्त्व जरा वाढतें एवढें खरें. कारण तीं वर्षांतून फार तर दोनदां घरीं येणार आणि फार तर दीड-दोन महिने रहाणार. त्यांतहि अगदीं जवळचे नातलग किंवा मित्र-मैत्रिणी आपल्या घरीं थोडे दिवस रहावयास येण्याचा आग्रह करून एक-दोन आठवडे त्यांतले कमी करणार ! आपल्या मुलांचें असें अगत्य व मान वाढल्यानें आईबापांचा आनंद वाढला तरी मुलांच्या सहवासाला सुट्टींतील तेवढे थोडे दिवस तरी मुकावें लागल्याबद्दल आईच्या हृदयाला थोडा विषाद वाटल्याशिवाय रहात नाहीं. आपल्या मुलांच्या सुट्टींत कोणी वांटेकरी असूं नये, त्यांचा सारा सहवास आपणांसच मिळावा, त्या काळांत त्यांना आवडणारे निरनिराळे पदार्थ करून ते प्रेमानें त्यांना खाऊं घालावे, त्यांच्या आवडीच्या गोष्टी कराव्या, आपल्या

इष्टमित्रांना घरीं बोलावून त्यांच्याकरवीं मुलांचें कौतुक करावें, त्यांना घेऊन इष्टमित्रांकडे जावें, एखादी ट्रिप काढावी, नाटक-सिनेमाला जावें, त्यांच्या-करितां कापडाची व इतर अवश्य वस्तूंची खरेदी करावी, एक ना दोन अशा कितीतरी गोष्टी व गमती मुलांच्यासाठीं कराव्या असें आईबापांना वाटत असतें. मालतीबाईहि याला अपवाद नव्हत्या. मुलगी आल्यापासून त्या नेहमीं कांहीं ना कांहीं नवीन कार्यक्रम करीतच असत. आजहि मधल्या वेळच्या फराळा-साठीं ओल्या नारळाच्या करंज्या करून ठेवून दिवाणखाना शृंगारण्यांत त्या गढून गेल्या होत्या. भिंतीवरच्या फोटोंच्या चौकटी व कांचा पुसून खिडक्यांचे पडदे व टेबलावरील रुमाल त्या बदलीत होत्या. तें पाहून त्यांची धाकटी मुलगी म्हणाली,

" आई, आज काय आहे आपल्याकडे ? दिवाळी ? "

" हो, नाहींतर काय ? चार दिवस अवकाश आहे आतां दिवाळीला. "

" मग आतांपासूनच हें सारं नवं नवं केलंस ? "

" आपल्याकडे किनई पाहुणे येणार आहेत. मग हें करायला मला वेळ होणार नाहीं. "

" कुठले पाहुणे ? कशाला येणार ? करंज्या खायला ? "

मालतीबाई हंसून म्हणाल्या,

" करंज्या तर खातीलच; पण आपल्या ताईला पाह्यला येणार आहेत!"

" ताईला पाह्यला ? कोण येणार ? "

" त्या उमरावतीच्या वीणाकाकी आहे ना ? त्यांचा मुलगा वसंतराव येणार आहे. "

" मग त्यांच्याशीं आपल्या ताईचं लग्न होणार आई ? "

" हो. "

बाहेरून आलेल्या हेमाच्या कानीं हा संवाद पडला होता. मालतीबाईचा होकार पूर्णपणें उच्चारून होतो न होतो तोंच एकदम आंत येऊन ती म्हणाली,

" हें ग काय, कांहींतरीच तिला सांगतेस ? "

" कांहींतरीच काय ? खरंच वसंत येणार आहे. आजच वीणाबाईंचं पत्र आलं. "

" मग ! येणार असेल ! त्याचं काय ? उगाच माझ्या नांवाचा संबंध जोडून तिला कांहींतरी कशाला सांगतेस ? "

" काय झालं सांगितलं म्हणून ? कांहीं दिवसांनीं साऱ्यांना कळणारच कीं नाहीं ? "

" आई, मी कितीदां सांगितलं तुला तरी तुझं आपलं तेंच ! लहानपणीं थट्टेनं बोलत होतां तेव्हां मला कळत नव्हतं; पण आतां मला नाहीं असलं आवडायचं. वसंत येणार असेल अन् असं कांहीं होणार असेल तर मी जाईन आपली चार दिवस शरदकडे ! "

मालतीबाईंनीं मुलीकडे रोंखून पाहिलें. तिचा चेहरा किंचित आरक्त झाला होता आणि त्यावर एक प्रकारची निश्चयाची छटा पसरलेली होती. मालतीबाई मृदु स्वरानें म्हणाल्या;

" पण तुला एवढं चिडायला काय झालं मला कळत नाहीं ! वसंत कसा अन् काय आहे हें कांहीं तुला सांगायला नको. बी. ए. अन् एम्. ए. झालेल्या आईबापांचा तो मुलगा. स्वतःहि नुकताच बी. ए. झाला आहे. झालं तर तो इंग्लंडला सुद्धां जाईल—"

" अन् तिथला राजासुद्धां होईल ! " हेमा आवेशानें पुढें म्हणाली, " पण माझं स्वास्थ्य हिरावून घ्यायचा त्याला काय अधिकार ? त्याच्या अन् त्याच्या घराण्याच्या चांगुलपणाविषयीं माझं दुमत नाहीं; पण आपला चांगुलपणा बळेंच दुसऱ्यावर लादणं बरं नाहीं. "

मुलीच्यापुढें बोलण्यांत आपला टिकाव लागायचा नाहीं हें मालतीबाईंना कळत होतें तरी त्या म्हणाल्या,

" खरंच, मुली कॉलेजांत जाऊन पुरुषी शिक्षण घेऊं लागल्या कीं अगदीं पुरुषांसारख्या होतात. वडील माणसांना तडातड उत्तरं देतांना त्यांना कांहीं-सुद्धां वाटत नाहीं. "

मालतीबाईची ही मात्रा लागू पडली. हेमावती मृदुपणें म्हणाली,

" आई, असं एक तरी उदाहरण सांगतां येईल का तुला माझ्या बाबतींत ? "

" नाहीं तर काय ? आतां हेंच पहा ना. आम्हीं इतक्या विचारपूर्वक ठरवलेली गोष्ट; पण ती एका चुटकीसरशी तूं मोडूं पाहातेस ! असं करतांना तूं आमच्या मनाचा कांहीं विचार करते आहेस कां ? "

" पण तुम्हीं कांहींतरीच सांगूं लागल्यावर— "

" कांहींतरीच कसं ? बायकांच्या जातीला लग्न हें केव्हांतरी करायचंच असतं ना ? मग विद्येनं, कुळानं, शीलानं, वयानं आणि संपत्तीनं अगदीं योग्य असं हें स्थळ असतां तुझी कुरकुर कां असावी मला कळत नाहीं. "

हेमा कांहींच बोलली नाहीं. आपल्या बोलण्याचा ती विचार करीत आहे या विचारानें उत्तेजित होऊन मालतीबाई पुढें म्हणाल्या,

" वसंत किती चांगला मुलगा आहे ! घरचं वळण चांगलं. वीणाबाई अन् विनायकराव एवढीं शिकलेलीं माणसं पण— "

" तेंच तें पुनःपुन्हा कशाला सांगतेस ? तें सारं मला माहीत आहे ! "

" मग बरं ? आपला किती दिवसांचा घरोबा– त्यांचे आमच्यावर उपकार तरी किती झाले आहेत ? तूं झालीसुद्धां नव्हतीस, तेव्हां आजारी पडले, आणि सारं वर्ष आजारांत गेलं. हक्काची रजा संपली अन् पुढं जवळ जवळ वर्षभर बिनपगारी रजा घ्यावी लागली. त्या वेळीं विनूभाऊजींनीं मदत केली नसती तर कठीणच होती परिस्थिति ! स्वतःचा जीवच त्यांनीं वांचविला म्हणेनास ! "

" त्या उपकाराच्या फेडीसाठीं का हें सारं? मग मात्र माझा बळी घ्यायचा आहे खरा त्यांना अधिकार ! "

" हेमा, हेमा ! असा विपर्यास करूं नकोस. निदान त्या चांगल्या निस्पृह माणसांबद्दल तरी नको ! "

" पण आई, तूं तरी विनाकारण कां हें करतेस ? ' तीं माणसं वाईट '

असं मीं कधींतरी म्हटलं आहे का ? मी अगदीं विनशर्त कबूल करतें कीं, वसंत फार चांगला मुलगा आहे; पण त्याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. घरोबा आणि उपकार असतील व ऋणानुबंधहि जुना असेल; पण तो कायम टिकविण्याला हाच एक मार्ग आहे काय ? "

मालतीबाई आश्चर्यानें अवाक् होऊन मुलीचें वक्तृत्व ऐकत होत्या. हेमा पुढें म्हणाली,

" त्यांचा स्नेह जर अकृत्रिम असेल तर तो पुढेंही अबाधित टिकेल ! माझ्यासुद्धां कांहीं आवडीनिवडी असतीलच कीं नाहीं ? माझ्या मताला कांहींच महत्त्व नाहीं का ? "

" म्हणजे ? "

अडखळत अडखळत हेमा म्हणाली,

" म्हणजे माझं लग्न ठरलेलं आहे ! "

" अगबाई ! "

मालतीबाई स्तंभितच झाल्या ! व पुढें काय बोलावें हें त्यांना सुचेना. बोललों तर आपला मनावरील ताबा सुटून आपण अधिक-उणें बोलून जाऊं व त्याचा परिणाम विपरीत होईल अशा विचारानें त्या गप्प राहिल्या. त्यांच्या दृष्टीला कित्येक वर्षांपूर्वीचा देखावा दिसूं लागला.

* * *

एकदां तारेनें निमंत्रण आल्यावरून पतिराजासमवेत त्या विनायकरावांच्या लग्नाला गेल्या होत्या. विनायकरावांचा हा प्रीतिविवाह होता. विनायकराव व वीणाबाई दोघेही पदवीधर होतीं. परंतु त्यांचें कोणी नसल्यामुळें व नुकतेंच शिक्षण पूर्ण झाल्यामुळें आर्थिक स्थितीहि बरी नसल्याकारणानें त्यांच्या लग्नासाठीं आपल्या पतीनें आपले दागिने विकून त्यांना द्रव्यसहाय्य केलें व स्वतः सपत्निक हजर राहून कार्य पार पाडलें. आपण जेव्हां गेलों तेव्हां विनायकरावांना कोण आनंद झाला ! हळदीभरल्या अंगानें पुढें येऊन ते हंसत हंसत म्हणाले— " चला, तुम्हांला माझी बायको दाखवितों ! "

त्यांची पत्नी वीणाबाई वधूवेषांत मैत्रिणींसमवेत बसलेल्या होत्या. आपण तेथें गेल्याबरोबर चिमण्या पटापट उडून जाव्या त्याप्रमाणें त्यांच्या मैत्रिणी उठून गेल्या; आणि वीणाबाई हंसत हंसत पुढें येऊन नमस्कार करून, जणूं काय पुष्कळ दिवसांची ओळख आहे अशा रीतीनें एकदम बोलूं लागल्या. बोलण्यांत त्यांनीं आपल्या मदतीचा उल्लेख करून उच्चारलेलें वाक्य तर आपल्याला अजूनहि जसेंच्या तसेंच आठवतें आहे. " आपण द्रव्यसहाय्य केलं म्हणून आम्हांला इतक्यांत विवाहबद्ध होतां आलं; नाहींतर सहा महिने तरी हा विचार पुढें ढकलावा लागला असता. " आणि किती गोड तऱ्हेनें त्यांनीं कृतज्ञतापूर्वक आपले आभार मानले !

रात्रीं वरात आली. तेव्हां गृहप्रवेशाच्या वेळीं आपण दार अडवून उभ्या होतों. तें पाहून विनायकराव म्हणाले,

" हें काय वहिनी, दार कां आडवलं ? "

तेव्हां आपण म्हणालों,

" काय करावं ? कंपनींत माणसं कमी असलीं म्हणजे एकालाच दोन तीन पार्ट घ्यावे लागतात; त्यांतलंच हें ! आतां मी वहिनी नाहीं. बहीण झालें आहें. मुलगी देण्याचं कबूल करा म्हणजे वाट सोडीन ! "

तेव्हां स्वतःच हंसून म्हणाले,

" नाहींतर घेण्याचं तरी कबूल करा ! "

तेव्हा आपण म्हणालों,

" अशा सुशिक्षित सासूसासऱ्यांच्या घरांत मोठ्या आनंदानं मुलगी दिली असती; पण नाहींच ती कुठली द्यायची ? "

" पहा बरं ! मग माघार घ्याल ! "

—वीणाबाई मंजुळस्वरानें म्हणाल्या

त्यावर आपण ठांसून उत्तर केलें,

" मुळींच नाहीं ! मात्र स्वतः शब्दाची आठवण ठेवावी. "

वीणाबाई कांहीं बोलणार होत्या; पण विनायकरावच म्हणाले,

" पाहिलं, किती झालं तरी बायकाच ! मुलांवरून भांडल्याशिवाय कध्धीं रहायच्या नाहींत ! मग तीं अस्तित्वांत कां नसेनात ! "

यावर सर्व मंडळी हंसू लागलीं.

* * *

दोन तपांपूर्वीचा तो प्रसंग. त्यानंतर दीड वर्षांनीं वीणाबाईंना मुलगा झाला व चार वर्षांनीं हेमाचा जन्म झाला. व्यवसायनिमित्तानें राहणें जरी निरनिराळ्या गांवीं होतें, तरी दिवसेंदिवस उभय कुटुंबांतील स्नेहसंबंध इतके दृढ झाले होते व ऋणानुबंध इतके वाढले होते कीं, नात्याच्या ग्रंथीनें त्यांना अधिक दृढ बंधन घालून एकत्र जोडावें व अशा रीतीनें थट्टेच्या बोलण्याला मूर्त स्वरूप आणावें अशी मनीषा उभय कुटुंबांत उत्पन्न झाली होती. तिला धरूनच उभय कुटुंबाचें वागणें असे. मुलांचाही परिचय होताच. अगदीं परवां परवांपर्यंत सुटींत एकमेकांच्या गांठी पडल्या म्हणजे " जांवईबापू " व "सूनबाई" या नांवांनीं तीं परस्पर मुलांना संबोधीत असत, हेंहि मालती-बाईंना पक्कें आठवत होतें. अलीकडे दोन वर्षांत एकमेकांकडे जायला झालें नाहीं. तेवढ्यांत एवढें स्थित्यंतर व्हावें ?

संध्याकाळीं इत्थंभूत हकीगत त्यांनीं माधवरावाच्या कानीं घातली. ती ऐकून त्यांनाही मोठा पेंच पडला. त्यांना आजच आलेलें विनायकरावांचें पत्र त्यांनीं पुन्हा वाचलें—

"........चि. वसंत इंग्लंडला जायचें म्हणतो आहे. बेत कांहीं वाईट नाहीं. परंतु त्यापूर्वी मागें ठरल्याप्रमाणें हेमाच्या संमतीनें लग्नाचें निश्चित ठर-वावें, याकरितां मुंबईहून परस्परच आपणाकडे जाण्यास व नक्की करण्यास त्याला लिहिलें आहे. इंग्लंडला जाण्यापूर्वी त्यानें लग्न करावें अशी आमची इच्छा आहे. त्याचें काय ठरतें तें कळवावें. जरूर तर दिपवाळीच्या सुट्टीपैकीं शेवटचे दोन दिवस आपणांकडे आम्हांला घालवितां येतील. तशी आवश्य-कता असल्यास कळवावें. "

यावरून उद्यां वसंत येणार अन् घरांत ही स्थिति ! एवढया मोठ्या शिकल्यासवरलेल्या समजंस मुलीला धाकदपटशा तरी कसा दाखवायचा ? तिच्याशीं अधिकउणा वादविवाद केला तर उद्यां वसंत येणार त्यापूर्वीच ती म्हणते त्याप्रमाणें मैत्रिणीकडे निघून सुद्धां जायची, किंवा अधिकच बिथरून नीट वागणारही नाहीं ! त्यापेक्षां स्वस्थ रहावें हेंच बरें. अशा विचारानें व अस्वस्थ मनानें माधवराव स्तब्ध राहिले. मुलीला ते कांहींच बोलले नाहींत.

* * * *

ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं वसंत आला. त्याच्या मुखावरही गांभीर्याची छाया पसरलेली दिसत होती. किती शिकला तरी तो हिंदु मुलगा ! ज्या कामगिरीवर तो आला होता, ती बजावतांना अशा गांभीर्याची आवश्यकता होतीच ! हेमाहि गंभीर होती; परंतु आदरातिथ्यांत वैगुण्य येईल असें वागत नव्हती. त्यामुळें आईबापांना हायसें वाटत होतें.

तिसऱ्या दिवशीं छोट्या लिलीबरोबर मेकॅनोची जुळवाजुळव करीत वसंत बसला असतां ' जरुरीच्या कामासाठीं बाहेर जाऊन येतों ' असा निरोप घेऊन माधवराव बाहेर गेले. आपल्या खोलींत केंस आणि कुंकू नीट करून बाहेर जाण्याची तयारी करीत असलेल्या हेमावतीला ' जरुरीच्या कामासाठीं कमलाबाईकडे उभ्याउभ्या जाऊन येतें, चहाचं आधण ठेवलं आहे, तुमचा चहा होऊं दे, तोंवर येतेंच ' असें सांगून मालतीबाई झट्‌कन् तेथून निघाल्या. जातांना लिलीलाही त्यांनीं बरोबर घेतलें ! घरांत वसंत आणि हेमा एकटींच राहिलीं. वसंत दिवाणखान्यांत येऊन बसला. हेमानें चहा आणला. चहापान-समारंभ मूकपणेंच पार पडला. नंतर हेमा आपल्या खोलींत गेली. सुरवात कशी व कोणीं करावी हा दोघांपुढें प्रश्न होता. अवघड वांटा पुरुषानें उचलावा या नियमाला अनुसरून शेवटीं वसंत हेमाच्या खोलीकडे वळला.

" हेमावती ! " तो अडखळत बोलला, " हेमावती मला थोडंसं बोलायचं आहे. "

हेमानें चमकून त्याच्याकडे पाहिलें. त्याची मुद्रा कातर दिसत होती. ती थोडक्यांत म्हणाली,

" मलाहि थोडं बोलायचं आहे, बसा. "

तिनें दाखविलेल्या खुर्चीवर तो बसला. प्रथम त्यानें जपून व अडखळत अडखळत सुरवात केली. सुरवातीला हेमाच्या स्वरांत तीक्ष्णत्व जाणवत होतें; पण कांहीं वेळ विचारविनिमय झाल्यानंतर त्यांच्या स्वरांत मोकळेपणा आला, मुद्रेवरील गांभीर्य नष्ट झालें आणि संभाषणांतील माधुर्य वाढत गेलें !

संध्याकाळीं दिवेलागणीच्या वेळीं मालतीबाई व माधवराव घरीं येऊन पहातात, तों जातांना आपापल्या खोलींत एकएकटीं बसलेली वसंत आणि हेमा दिवाणखान्यांत एकत्र बसून कॅरम् खेळत होतीं ! त्यांनीं एकमेकांकडे अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें. आपण मुलीला बोलून दुखाविलें नाहीं, स्वस्थ राहिलों हें किती शहाणपणाचें झालें, शेवटीं निसर्गच प्रभावी ठरला, असें त्यांना वाटलें.

ही बातमी विनायकराव व वीणाबाई यांना कळविण्यांत आली. त्यांनींहि दिवाळीसाठीं यावें असें आग्रहाचें निमंत्रण करण्यांत आलें. त्याप्रमाणें दिवाळीच्या सुट्टीचे दोन दिवस आनंदांत घालविण्यासाठीं व पुढील बेत ठरविण्यासाठीं तीं दोघें आलीं.

आज भाऊबीजेचा दिवस होता. मुलें फिरायला गेलीं आणि वडील माणसें त्यांच्यासंबंधानें बोलत बसलीं होतीं. वीणाबाई म्हणाल्या,

" काय लबाड तरी ! मला आपलं कांहींतरीच लिहिलं होतं त्यानं. कोणी शरदिनी म्हणून मुलगी होती त्याच्या कॉलेजांत, तिच्याशीं लग्न करायचं नक्की ठरवलं म्हणे. तीं माणसं आतां पुण्यास बदलून गेलीं आहेत. ' केलं तर तिच्याशींच लग्न करीन नाहीं तर नाहीं.' असं प्रतिज्ञेवर लिहिल्यामुळं चिन्तेंतच होतों आम्हीं ! पण इकडे पाठवल्यामुळं सुरळीत झालं सगळं ! हेमा मोठी हुषार हं ! "

मालतीबाई हंसत हंसत म्हणाल्या,

" आतां सांगायला हरकत नाहीं म्हणा, पण आमच्याकडे सुद्धां तोच प्रकार होता ! लग्नच करायचं नाहीं म्हणे ! "

सर्वांनीं दीर्घ हास्य केलें. इतक्यांत हेमा व वसंत घरीं आलीं. त्यांच्याकडे प्रेमार्द्रदृष्टीनें पहात वीणाबाई म्हणाल्या,

" लबाडांनो, थांग लागूं देत नाहीं मनाचा नाहीं का ? "

दोघेहि हंसत हंसत खुर्चीवर बसलीं. समोरच्या गवाक्षांतून दिसणाऱ्या चंद्राच्या चिमकुल्या कोरीकडे हेमाची दृष्टि खिळून राहिली होती. पाहतां पाहतां तिच्या मनांत काय आलें न कळे. ती एकदम उठली व देवघरांत जाऊन एका तबकांत निरंजन आणि एक रंगीत पाट घेऊन आली. पाट मांडून ती म्हणाली,

" अहो वसंतभाऊ ! बसा ह्या पाटावर ! आज मी तुम्हांला ओंवाळणार आहे ! "

वसंतानें तिची आज्ञा बिनशर्त मानली.

ओवाळतांना हेमा म्हणाली,

" आतां लौकरच आम्हांला वैनी आणा बरं का ! "

नंतर स्तिमित झालेल्या वीणाबाईकडे वळून ती म्हणाली,

" काकी ! वसंतानं निवड मात्र छान केली आहे हं ! शरदिनी माझी मैत्रिणच आहे ! "

" अन् तुझी निवड काय वाईट आहे ? मोहनला मी ओळखतों ! तो आधीं आमच्याच कॉलेजमध्यें होता. मुंबईची हवा मानवेना म्हणून फर्ग्युसन-मध्यें गेला. "

वडील मंडळींना आश्चर्याचे आघात एवढ्या जोरानं बसले कीं, प्रथम तीं स्तिमितच झालीं. परंतु आपणांस न सुटणारा प्रश्न मुलांनीं सुलभतेनें—स्नेहबंधनास धक्का न लावतां— चट्कन् सोडविलेला पाहून त्यांनीं एकमेकांकडे आश्चर्यानें पाहिलें !

---

# अलौकिक आत्मदमन : : ७

राजसत्तेच्या नियंत्रणाखालीं असलेल्या जहागिरीचा हक्क व इस्टेटीचा ताबा मिळाल्यामुळें आनंदानें धांवतच माईसाहेबांना अभिवादन करावयाला कुमार त्यांच्या खोलींत आले. पण तेथें त्या नव्हत्या. त्यांना शोधीत ते दिवाणखान्यांत आले. तेथील भव्य फोटोला पुष्पहार घालून वंदन करणाऱ्या मातेच्या करुणमूर्तीकडे ते पाहतच राहिले. त्यांची मुद्रा अनेकविध विचारतरंगांनीं गोंधळून गेली. मातेच्या कृतीकडे नापसंतीचा नेत्रकटाक्ष टाकून ते तसेच मागें परतले. इतक्यांत माईसाहेबांनीं हांक मारली,

"कुमार ! इकडे या. वडिलांना वंदन करा."

कुमार मागें वळले, परंतु त्यांनीं मस्तक वांकविलें नाहीं, कीं हात जोडले नाहींत ते स्तब्ध उभे राहिले. माईसाहेब म्हणाल्या,

"हें काय बाळ ? वंदन कराना !"

तरी ते स्तब्धच राहिले. परंतु आईच्या कष्टी मुद्रेकडे दृष्टि जातांना–विशेषतः ती रुग्णशय्येवरून उठून येऊन हें प्रतिमापूजन करीत आहे या गोष्टीची बुद्धीला जाणीव होतांच कुमारांनीं नाखुषीनेंच हात जोडले.

" माईसाहेब, तुम्हांला बरं वाटावं म्हणून नमस्कार करतों. पण खरं म्हणाल, तर बाबासाहेबांच्याबद्दल माझ्या मनांत आदर फार थोडा आहे ! "

पुत्राकडे चकित दृष्टीनें पाहत माईसाहेब म्हणाल्या,

" कां ? "

काय बोलावें हें त्यांना कळेना. ते खालीं पाहूं लागले. माईसाहेब म्हणाल्या,

" कुमार, वडिलांविषयीं अनादर दाखवणं शोभतं का लहान मुलांना ? "

सरकारी कायद्यानें सज्ञान झालेल्या आपणास अजूनही माई लहान समजतात या विचारानें कुमारास हंसू आलें. तें दाबून ते म्हणाले,

" अनादराला कारणं आहेत. लोक म्हणतात—"

पुन्हा ते स्तब्ध राहिले. माईसाहेब तीव्र स्वरानें म्हणाल्या,

" काय म्हणतात ?– अन् कोणते ते लोक ? "

" ते तरसोदचे विलासराव इनामदार विशाळराव जाहगिरदारांना म्हणत होते कीं, ' बाबासाहेबांनीं आपल्याशीं लग्न करायला तुम्हांला भाग पाडलं, नात शोभेल एवढ्या लहान मुलीशीं त्यांनीं—सक्तीनं लग्न केलं व लोकांनीं चर्चा करूं नये म्हणून पुष्कळ दानधर्म केला. ' असं ते माझ्याकडे पाहून एकमेकांशीं बोलत होते. "

आईचा चेहरा संतापानें लाल झाला. थरथर कांपणाऱ्या ओठांनीं ती म्हणाली,

" बाळ, लोकांच्या तोंडाला हात कुणीं लावावा ? ते काय वाटेल तें बोलतील. पण—"

" आणखी अशा विषम विवाहामुळंच तुमची प्रकृति अशी कायमची बिघडली असंही ते म्हणत होते. "

" पुरे, पुरे झालं, कुमार ! लोक काय वाटेल तें बोलतील. तें ऐकून खरं मानण्याइतके कच्चे कान असूं नयेत तुमचे ! "

कुमारांनीं खालच्या मानेनेंच वर पाहिलें. माईच्या डोळ्यांतून टपोर अश्रुबिंदु ओघळण्याच्या बेतांत होते व ते खालीं पडूं न देण्याबद्दल त्या

शिकस्तीचा प्रयत्न करीत होत्या. लोकवार्ता ऐकून उगाच आपण आपल्या रुग्ण साध्वी मातेला दुःख दिलें, याचें त्यांना वाईट वाटलें. करूं नये ती चूक करून बसल्यावर कोणत्या शब्दांत तिचें सान्त्वन करावें हें त्यांना सुचेना. मुकाटयानें ते तेथून चालते झाले. एकांत मिळतांच माईनीं शय्येवर धाडकन् अंग टाकलें व अश्रूंना वाट करून दिली.

चार दिवस कुमारांना अगदीं चोरटयासारखें झालें होतें. आईच्या सेवा-शुश्रूषेंत कांहीं कमतरता राहूं नये म्हणून वेळोवेळीं ते विचारपूस करीत, परंतु पूर्वीसारखा मोकळेपणा राहिला नव्हता. त्यामुळें बहुतेक वेळ त्यांना आपल्याच खोलींत काढावा लागत असे. रिकामपणाचा उद्योग म्हणून इकडे तिकडे करीत असतां वडिलांची छोटी पेटी त्यांनीं उघडून पाहिली. तींत वरच्याच खणांत त्यांना आपल्याच नांवचें एक जाड पाकिट आढळलें. तें उघडून पाहतां वडिलांनीं कांपऱ्या हातांनीं लिहिलेल्या पुष्कळशा कागदांचें एक पुडकें त्यांना आढळलें.

'काय बरं लिहून ठेवलं आहे बाबासाहेबांनीं माझ्यासाठीं!' कुमार आश्चर्यानें व अधीरतेनें वाचूं लागले.

## [ २ ]

ती सूर्यास्ताची वेळ होती. गाई केव्हांच घराकडे गेल्या होत्या. दिवसभर श्रमलेलीं पांखरें आपापल्या कोटरांचा आश्रय घेण्यासाठीं किलबिल करीत झाडांकडे परतत होतीं. अशा वेळीं एक वृद्ध आपल्या निवासस्थानापासून दूर नदीकांठीं पात्रावर निश्चल नजर लावून विमनस्कपणें बसला होता. जणूं घरीं जाण्याची त्याला ओढच नव्हती. कसल्या तरी तापदायक विचारानें तो खचल्यासारखा दिसत होता. त्याच्या मुद्रेकडे जर कोणीं पाहिलें असतें तर त्यानें सारा जन्म विचार करण्यांतच घालविल्याची साक्ष त्याच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावरून सहज पटली असती. शेवटीं त्यानें दीर्घ निःश्वास टाकला व आपल्या चेहऱ्यावरून हात फिरवून तो रुद्ध स्वरानें कांहीं बोलूं लागला.

त्याला स्वगत बराच वेळ बोलत असलेला पाहून कोणालाही तो वेडा आहे असेंच वाटलें असतें. परंतु तो वेडा नव्हता ! दुःखाच्या दारुण आघातानें तो विव्हल झाला होता. त्याचा एकुलता एक तरुण, सुविद्य पुत्र नुक्ताच दिवंगत झाला होता. त्या दुःखानें कळवळून तो म्हणत होता,

" बाळा, किती रे मी हतभागी ! तुझा सुखाचा संसार पाहण्याऐवजीं तुझ्या अंतिम हालअपेष्टा मीं पाहिल्या. तूं माझी अंत्य व्यवस्था करावीस, ती तुझी करण्याचं माझ्या दैवीं आलं. हाय रे दैवा ! उत्तर आयुष्य कंटाळवाणं तर खरंच. पण अशा असीम दुःखानं तें अधिकच असह्य वाटतं. देवा ! नाहीं, सोसवत नाहीं; हें दुख आतां सोसवत नाहीं ! आतां माझं या जगांत काय उरलं आहे ? कोणते सुखोपभोग भोगायचे बाकी राहिले आहेत ? इतरांना दुर्मिळ इतकं विविध व विपुल सुखैश्वर्य मीं भोगलं आहे यथाशक्ति मीं आपलीं कर्तव्यंही नीट केलीं आहेत. आणि आतां हें असीम दुःख भोगीत आहें ! देवा, हें जर्जर शरीर दुःख भोगायला असमर्थ असतां व या नीरस जीवनांत तादृश गोडी वाटत नसतांही त्याचा मोह सुटत नाहीं, हें केवळ आश्चर्य ! आपल्या हातांनीं या देहाचा नाश करवत नाहीं. गीतेची शिकवण, साधुसंतांचीं वचनं पुढं उभीं राहतात आणि या विचारापासून मनाला परावृत्त करतात. खरोखर हा देहाचा मोह कीं विवेकाची शिकवण ! कांहींच कळत नाहीं. मति कुंठित होते. इतक्या दीर्घ काळापर्यंत हें जीर्ण शरीर जगविण्यांत ईश्वरा, तुझा काय हेतु आहे कळत नाहीं. का अजून कांहीं कर्तव्य—"

" धप्प् बुड्ड्ड्. "

आकस्मित झालेल्या आवाजानें वृद्धाची विचारशृंखला तुटली. काळोख पडूं लागला होता. कपाळावर आडवा हात धरून व डोळे संकुचित् करून त्यानें नदीकडे दूरवर न्याहाळून पाहिलें. पाण्याच्या पृष्ठभागीं बुडबुडे व त्यांसभोंवतीं पसरणारीं वर्तुळें व दीर्घ वर्तुळें दिसतांच अस्तन्या वर सारून तरूणाच्या तडफेनें धांव घेऊन त्यानें नदींत उडी टाकली. पाण्याशीं झगडणारा तो

हतभागी जीव वांचविण्यासाठीं त्या वृद्धानें अविश्रांत श्रम केले. पूर्व काळीं कमावलेलें तें शरीर असल्यामुळेंच त्याच्या प्रयत्नाला यश आलें. केंसांचे पेड हातावर गुंडाळून त्या उशीवर त्या बुडणाऱ्या व्यक्तीचें मस्तक तरंगतें ठेवून त्यानें तिला किनाऱ्यावर आणलें. ती एक सुंदर तरुण मुलगी होती. तिच्या निश्चेष्ट निर्मळ मुखकमलाकडे पाहून वृद्धानें एक दीर्घ निःश्वास सोडला व कपाळाला हात लावून तो म्हणाला,

" अरेरे देवा ! इतक्या लहानपणीं जिवावर उदार होण्याइतकं या मुली-वर संकट तरी कोणतं कोसळलं ? आमच्यासारख्या जीर्ण खोडांना अशा स्थितींतही जिवाचा मोह सुटत नाहीं. आणि ही सुकुमार मुलगी ! हिला आपलं अर्धविकसित पुष्पासारखं कोमल शरीर मृत्यूच्या दाढेखालीं आपल्या हातानं बिनदिक्कत लोटवलं तरी कसं ? "

वाढत्या काळोखांत मदतीशिवाय तिला सावध करणें अशक्य वाटून पली-कडे सडकेवर उभ्या असलेल्या आपल्या गाडीकडे वृद्ध जाऊं लागला. काळोख व उशीर झाल्यामुळें हातांत कंदील घेऊन नोकर येतच होता. त्याच्या मद-तीनें त्यानें तिला गाडींत नेऊन ठेविलें.

+ + +

" उगी बाळ ! रडूं नको. तुला आवडत नसेल तर नको सांगूं कांहीं; पण घरीं तुझीं माणसं काळजी करीत असतील ना ? त्यांना कळविण्यासाठीं तेवढा पत्ता सांगितला असतास तर बरं झालं असतं. "

दोन्ही हातांनीं तोंड झांकून ती फारच रडूं लागली. तिची ती स्थिति पाहून वृद्धाचे डोळे अश्रूंनीं भरून आले. मृदुपणें तिच्या मस्तकाला स्पर्श करून तो म्हणाला,

" बाळे, आम्हीं काय बरं समजावं ? "

" बाबा, मला घर अन् माणसं कोणीच नाहींत. "

" अरेरे ! गरीब बिचारी पोर ! "

" मला आपण कशाला वांचवलीत ! आई ग! आतां काय करूं? " दोन्ही हातांनीं मस्तक धरून रडत रडत तिनें केविलवाणीनें प्रश्न केला.

" तूं स्वस्थ पडून विश्रान्ति घे, बाळ; श्रमानं डोकं हलकं झालं आहे. जरा झोंप घे. "

हुंदके देत म्हणाली, " झोंप ? आतां कसली झोंप ? "

" असा त्रागा कां करतेस मुली ? तुला काय होतं आहे ? "

" कसं सांगूं तुम्हांला, बाबा ! मला जगतां येणार नाहीं. प्राण दिल्या-शिवाय माझी अब्रू वांचणार नाहीं. मला कशाला वांचवलीत ? आतां सारं जग कावळ्यासारखं टोचटोंचून मला खाईल. त्यापेक्षां सुखानं मरत होतें– "

" मुली, शान्त हो. मोकळेपणीं तुझी सारी हकीकत सांग. ज्यानं तुला फसवलं असेल तिथून शोधून काढून तुझ्याशा लग्न करायला भाग पाडीन. "

कपाळावर हात मारून ती म्हणाली,

" हतभागी मी ! बाबा, ते जिवंत असते तर त्यांना भाग पाडण्याची मुळींच जरूर नसती. पण दुर्दैव माझं ! मला कुणी फसवलं नाहीं ! दैवानं फसविलं ! "

तिच्याशीं अत्यंत सहानुभूतीनें व प्रेमळपणानें बोलून वृद्धानें तिला आपली हकीकत सांगावयाला लाविलें. ती ऐकत असतां वृद्धाच्या मुद्रेवर निरनिराळे भाव उमटत होते. शेवटीं तिनें आपल्या वल्लभाचें नांव उच्चारलें तेव्हां तो विजेचा धक्का बसल्याप्रमाणें चमकला ! नंतर आवेशानें म्हणाला,

" काय ? माझा सुधारकच तुझा वल्लभ ? मुली, मग तूं तर आमची– " आश्चर्य आणि आवेश यांचा आकस्मिक आघात वृद्धाला सहन झाला नाहीं. बसल्याजागींच त्यानें खुर्चीवर मागें मान टाकली व डोळे मिटून घेतले. तरुणीही अवाक् झाली. कांहीं वेळानें भानावर आल्यासारखें करून वृद्ध स्वतःशीं पुटपुटला,

" देवा, तुझी लीला अगम्य आहे ! "

आश्चर्य आणि भय यांनीं ती गोंधळून गेली असतां तो तेथून निघून गेला.

मुलीची व्यवस्था फार चांगलीं राखली जात होती. निरनिराळ्या उपयोगांसाठीं तिला स्वतंत्र खोल्या दिल्या होत्या. तत्परतेनें हुकूम ऐकायला नोकर आणि दासी नेहमीं हजर असत. स्वास्थ्याखेरीज तिला कसलीच वाण नव्हती. या चार दिवसांत वृद्ध तिच्या दृष्टीला पडला नव्हता. त्यामुळें ती फारच अस्वस्थ झाली होती. आपलें काय होणार? आपण बंदिवान आहों कीं स्वतंत्र ? याचा तिला कांहींच बोध होत नव्हता. चिंता आणि भीति यांमुळें तिच्या तोंडचें पाणी पळालें होतें. वृद्धाला हें कळत होतें. परंतु तिची भेट घेऊन तिचें सान्त्वन करण्याइतकें त्याचें हृदय अद्यापि स्थिरावलें नव्हतें ! विचार !–विचार–तो सारखा विचार करीत होता. एके दिवशीं जसाच विचारमग्न असतां तो स्वतःशींच म्हणाला,

" ईश्वरा, एवढं आयुष्य मला तूं कशाला दिलंस ?–कर्तव्यासाठीं ? सुधाला नेऊन हें खडतर कर्तव्य तूं माझ्या वांट्याला आणलंस का ? देवा ! आमचा वंश शुद्ध, जुनं बाळबोध निष्कलंक कुळ— "

पलीकडे त्याची दृष्टि गेली. तेथें ती मुलगी उभी होती. तिला तें ऐकवेना. भयभीत हरिणीप्रमाणें ती कांपूं लागली. शक्य असतें तर तिनें पुन्हा जीविताचा नाश करण्याचा यत्न केला असता. परंतु त्या बाजूचा बंदोबस्त आधींच करण्यांत आला होता.

वृद्धानें तिच्या खोलींत प्रवेश केला. रडत रडत ती म्हणाली,

" मला आपण जाऊं द्या. मी माझ्या जिवाचं कांहीं—"

" वेडे मुली, कुठं जाणार तूं ? ईश्वरानंच तुला इथं आणलं आहे. त्याचा संकेत असाच असेल. असो. मीं हे बरेच दिवस फार विचारांत घालविले आहेत. ईश्वर जें करतो तें बऱ्याकरतांच असतं असं समजून त्यांतच समाधानानं राहिलं पाहिजे. हें पाहा, तूं अगदीं निर्धास्त अस. माझ्या सुधाच्या जागींच मी तुला लेखीन. "

भयचकित होऊन थरथर कांपणाऱ्या त्या मुलीला वृद्धानें आपली योजना हलक्या आवाजांत समजावून सांगितली. अविश्वास, भय, आणि दुःख यांनीं ती गोंधळून गेली. कानांवर हात ठेवून व डोळे गच्च मिटून तिनें भीतीनें अंग शहारल्यासारखें केलें. तिला धीर देत वृद्ध म्हणाला,

" बाळ, भिऊं नको. याशिवाय दुसरा मार्गच नाहीं. " वृद्धाचे इष्टमित्र व इतर लोक नेहमीं सान्त्वनासाठीं येतच होते. त्याप्रमाणें एके दिवशीं कांहीं जुने व अगत्याचे स्नेही आणि कांहीं भाऊबंद अशी मंडळीं आली. कारभारी, शास्त्री वगैरे रोजची आश्रित मंडळीही तेथेंच होती. एक स्नेही वृद्धाला उद्देशून म्हणाले, " हें पाहा, बाबासाहेब, आतां असा किती शोक करणार ! "

" हो, ज्या गोष्टीला कांहीं इलाज नाहीं तिच्यासाठीं किती शोक करणार!"

" अन् कितीही शोक केला तरी बाळासाहेब कांहीं परत येणार आहेत ! आतां आपण विवेकच केला पाहिजे. आपल्याला आम्हीं सांगावं असं नाहीं. "

" खरंच, हा भोग आहे. शरीरभोग जसा माणसाला सुटला नाहीं तसा कर्मभोगही सुटला नाहीं. ह्या कर्मभोगापायीं वैऱ्यावर येऊं नये तो प्रसंग आपल्यावर आला आहे. "

" पूर्वसंचिताचीं फळं, दुसरं काय ! ह्या जन्मीं तर बाबासाहेबांनीं मुंगीला दुखवलं नाहीं ! "

" तें खरं. पण आतां विवेक करायला पाहिजे. पुढचा कांहीं विचार पाहिला पाहिजे. आयुष्य तर असं क्षणभंगुर आहे. "

" हो; बाळासाहेब तर असे अकालीं गेले. मग म्हातारपणाचा काय नेम ? तेव्हां आपली पुढची व्यवस्था आपल्या हातांनीं करून ठेवणं सर्व दृष्टीनं बरं होईल. " एक दीर्घदृष्टि वृद्धआप्त पोक्तपणानें म्हणाले. त्याला सर्वांनींच दुजोरा दिला.

" पुढची काय व्यवस्था करणार ? अन कोणासाठीं करणार ? " वृद्धानें डोळे पुशीत प्रश्न केला. " ज्याच्यासाठीं करायचं तो तर पुढं निघून गेला.

आतां केव्हांही बोलावणं आलं तरी तयारी आहे. अन् तें लौकर यावं अशी इच्छा आहे. "

" तें खरंच आहे. चालू घडीलाही आमच्यासारख्यांची तयारी असणार. पण म्हणूनच एवढ्या पसाऱ्याची नीट व्यवस्था नको का लावायला ? "

दुःखितांचें सान्त्वन करण्याची चाल चांगल्याच उद्देशानें पडली असेल. परंतु हतभागी दुःखी प्राण्यांवर अनेकांच्या परोपरीच्या सान्त्वनाचा मारा होऊन दुःखाचें शमन होण्याऐवजीं तें दुणावतें मात्र ! वृद्धाच्या बाबतींतही तसेंच झालें. आपले समवयस्क आप्तेष्ट आपल्या दुखांत संविभागी होण्यासाठीं आलेले पाहून त्यांच्या सहानुभूतीच्या जाणिवेनें प्रथम त्याला मोठा हुंदका आला; परंतु एकएकाचे उद्गार ऐकून, हे दुःख शमविण्यासाठीं आलें आहेत, कीं सान्त्वनाच्या नांवाखालीं दुःखावर डागण्या देण्यासाठीं आले आहेत, याची त्याला शंका वाटूं लागली. तथापि आप्तेष्टांचाही फारसा दोष नव्हता. वृद्धानें वैराग्य धारण केलें, तरी त्याच्या हिताला जपणें हें ते आपलें कर्तव्य समजत होते. त्यांना वृद्धाच्या अवाढव्य संपत्तीची यथार्थ कल्पना होती. वृद्धानें दत्तक घ्यावा—आणि आपलाच मुलगा घ्यावा असें दर्शातील आप्तांना वाटणें साहजिकच होतें. ज्यांना मुलें होतीं ते अधीर उत्सुकतेनें चुळबुळ करीत होते. आणि ज्यांना नव्हतीं त्यांनाही कांहीं कमी उत्सुकता नव्हती ! वृद्धाला त्या सर्वांच्या सहानुभूतीचा उद्देश नीट कळला. त्यानें शान्तपणें उत्तर केलें,

" खरं आहे आपलं म्हणणं. आमच्या दुर्दैवामुळं आमचा बाळ अल्पायुषी झाला. शिवाजीच्याही पूर्वकाळापासून चालत आलेला आमचा वंश खुंटला. तेव्हां कांहीं तरी व्यवस्था करणं भाग आहे. आमचं पुरातन घराणं नामशेष होऊं नये, वतनाला वारस असावा असं आम्हांलाही वाटतं. "

" स्तुत्य; बाबासाहेबांची इच्छा अगदीं योग्य आहे. आपली इच्छा असेल तर आमचा बाबू–किंवा पाहिजे तर यांचा मधू— "

" ऐका, मी तेंच सांगतों. असं पाहा, दुसऱ्याचं मूल दत्तक घेण्यापेक्षां आम्हीं जर एखाद्या प्रौढ वधूशीं विवाह केला तर ? "

प्रत्यक्ष वीज कोसळली असती तरी ते सर्व एवढे चमकले नसते ! सर्वांनीं एकदम आश्चर्यानें वृद्धाकडे रोखून पाहिलें. नंतर ते एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. जणूं काय—

" म्हातारा एवढा दांभिक असेल अशी नव्हती कल्पना ! " किंवा " हें बकध्यान आम्हीं ओळखूनच होतों ! " अथवा " स्मशानवैराग्य एका महिन्यांतच मावळलं ! पाहिलं ? हत्तीचे खरे दांत ! " असेंच ते एकमेकांना नेत्रपल्लवीनें विचारीत आहेत !

" असे दचकूं नका. हें पाहा, आम्हीं विवाह केल्यानं आजपर्यंत चालत आल्याप्रमाणं औरस संततिच आमची वारस होईल; नाहीं का ? "

" होय सरकार ! "

" स्मशानांत गोवऱ्या जायला झाल्या तरी म्हाताऱ्याची हांव पाहा ! " असे मनांत उद्भवलेले विचार आंतल्या आंत गिळून कारभाऱ्यांनीं उत्तर केलें.

" अगदीं खरं. " एक निपुत्रिक आप्त वदले. आपल्या बोलण्याचा अर्थ न कळण्याइतके ते भांबावून गेले होते. नेहमींची ' होयबा वृत्ति ' आयत्या वेळीं साहाय्याला आली म्हणून बरें. नाहीं तर आश्चर्यानें वाङ्मूढ होऊनच ते राहिले असते.

" शास्त्राची कांहीं हरकत नाहीं ना, शास्त्रीबुवा ? " वृद्धानें विचारलें.

साधारण शुद्धीवर येत शास्त्रीबुवा म्हणाले,

" नाहीं; तशी हरकत नाहीं शास्त्राची. पण— "

" योग्य वधू मिळण्याचीच पंचाईत आहे. हो, एवढ्या वैभवाला शोभेशी योग्य अन् मोठी मुलगी तर मिळाली पाहिजे ना ? "

दिवाणजींनीं अडचण प्रकट केली.

" कोण आहे रे तिकडे ? सुभान्या ! "

" जी, सरकार ! "

धन्याच्या हाकेला हुजऱ्या हात जोडून पुढें आला. त्याला त्यानें हलक्या आवाजांत कांहीं सांगितलें. थोडयाच वेळांत–अंतःपुराच्या दारावरील रेशमी पडदा दूर सारीत व पुढील दिवाणखाना प्रकाशमान करीत एक सुंदर तरुणी पुढें आली. तिला पाहतांच या अवाढव्य ऐश्वर्याचा उपभोग घेण्याकरितां प्रत्यक्ष कमलाच कीं काय, असें त्या सर्वांना वाटल्याशिवाय राहिले नसेल. त्या सर्वांनीं नकळतच आदरानें तिला उत्थापन दिलें. नंतर शास्त्राबुवी म्हणाले, " ह्याच आमच्या भावी वहिनीसाहेब वाटतं ? " वृद्धानें होकारार्थी मान हालविली.

" योग्य. पसंत. "

शास्त्रीबुवांनीं पसंती दर्शविली. बिचारी तरुणी ! थरथर कांपूं लागली. तिला सांवरून आंत नेण्यांत आलें.

लौकरच विशेषसा गाजावाजा न करतां वृद्ध त्या सुंदर तरुणीशीं विवाहबद्ध झाला. त्याच्याविषयीं नेहमीं आदर बाळगणारे लोक आश्चर्यचकित झाले व ' साठी न् बुद्धि नाठी ' म्हणूं लागले. सर्वांच्या तोंडीं चर्चेला तोच विषय होता. वर्तमानपत्रांत तर––

" मुलाच्या मृत्यूमुळें आलेलें वैराग्य लौकरच मावळलें ! मोठा दानधर्म करून व संस्थांना देणग्या देऊन मिळविलेलें साधुत्व बेगडी होतें, हें लौकरच उघड झालें " इत्यादि टीकात्मक लेख येऊं लागले. तसेंच ' धनलोभी नातेवाइकानीं पैसा घेऊन पोरीचा विक्रय केला, कीं शिकलेसवरलेली पोरच पैशाला भुलून म्हाताऱ्याशीं लग्न करायला तयार झाली, ' या गोष्टीची चर्चाही मोठ्या सखोलपणानें जनतेनें केली ! या विवाहामुळें इतकी खळबळ उडाली तरी–वृद्धाचा जीवनक्रम जसा कित्येक वर्षांपूर्वी चालत होता तसाच आतांही चालू होता. आणि तरुणीबद्दल सांगावयाचें तर साधी राहणी, शांत निगर्वी स्वभाव व सन्यस्त वृत्ति या गुणांनीं तिनें थोडक्याच अवधींत त्याच टीकाकारांकडून भलें म्हणवून घेतलें.

काळाचें कार्यही अव्याहत चालूच होतें. त्या तरुण वृद्ध पत्नीनें विवाहानंतर सातच महिन्यांनीं त्या वृद्धाच्या अवाढव्य संपत्तीला औरस वारसाचा लाभ करून दिला. त्या आनंदोत्सवाप्रीत्यर्थ गुढयातोरणें उभारलीं गेलीं. चौघडा झडूं लागला मोकळ्या हातानें साखरपानें वांटलीं गेलीं. मूल अपुऱ्या महिन्यांचें जन्मलें, तें दीर्घायुषी व्हावें म्हणून पुष्कळ दानधर्म केला गेला. अनाथ अपंगांना अन्नदान सुरूच होतें. बाळबाळंतिणीला त्रास होऊं नये म्हणून सूतिकागृहात सुईण व सेवेकरिणींशिवाय इतरांना जाण्यास मज्जाव होता. तरी सूतिकागृहांतून बातमी पसरलीच कीं, ' मूल अपुऱ्या महिन्यांचें असलें, तरी पुऱ्या महिन्यांच्या बालकापेक्षांही बाळसेदार आहे ! "

आश्रित बायका म्हणत, " कांहीं नाहीं. जगूनवांचून बाळ मोठं होईल. ' सातारा अन् म्हातारा ' म्हणच आहे मुळीं ! सात महिन्यांचीं मुलं म्हातारीं झालेलीं पाहिलीं आहेत; आमचाही बाळराजा म्हातारा होईल ! "

तरुणीला हें ऐकून त्या स्थितींत पुष्कळच बरें वाटलें असावें. कारण तिची मनःस्थिति कोणच्याही कल्पनेच्या कक्षेंत येण्यासारखी नव्हती. आनंद आणि दुःख या दोहोंनीं मिश्रित असे विविध मनोविकार अशक्तपणाच्या आवरणाखालीं तिला दडवितां येत होते. ही एक तिच्या बाबतींत इष्टापत्तिच होती, आणि वृद्धाला जेव्हां बाळ दाखविलें तेव्हां त्याच्याही वृत्तींत कांहीं कमी चलबिचल झाली नाहीं ! बाळाकडे त्यानें सारखी टक लाविली होती. बाळाचें नाक, डोळे तो अगदीं निरखून पाहात होता; आणि या वेळीं त्याची छाती धडधडत होती, पाय कांपत होते आणि मुद्रेवर गंभीरता पसरली होती. बाळावरून बाळंतिणीकडे एक दृष्टिक्षेप टाकून तो मुकाट्यानें परत फिरला.

सृष्टिक्रमानुसार बाळ दिवसामासांनीं वाढूं लागला, तसतसें तरुणीच्या तोंडावरील दुःखाचें पटल विरल होत गेलें. बाळाचें कौतुक करण्यांत, त्याच्याशीं हंसण्या–बोलण्यांत, फार काय, अंतरींचें गुज सांगण्यांत तिचा वेळ केव्हांच जात असे. बाळासाठीं निरनिराळे नोकर असतांही त्याच्यावर देखरेख करण्याचें काम ती स्वतःच करीत असे.

वृद्धाच्या चिरवांच्छित आशेची पूर्तता झाली होती हें खरें. तरीही त्याच्या मुद्रेवरील दुःखाचा ठसा पुसला गेला नव्हता. उलट त्याच्या मूळच्या भव्य व टक्कलामुळें अधिकच रुंद दिसणाऱ्या कपाळावर आठयांचें जाळें अधिक पसरलें होतें. तो आपल्या विवाहित पत्नीशीं व बाळाशीं प्रेमानें व वात्सल्यानें वागे. त्यांच्या सुखसोईसाठीं तत्परतेनें निरनिराळ्या तजविजी करी. परंतु त्याची मुद्रा नेहमीं चिन्तेनें व्यापलेली असे. त्यामुळें वास्तविक होता त्यापेक्षांही तो अधिक वृद्ध दिसूं लागला. त्याला हवापालट केल्यानें बरें वाटेल असें डॉक्टरचें मत पडल्यानें ती मंडळी आपल्या एका खेड्यांतील वाड्यांत राहावयास गेली.

बाळ नुक्ताच पावलें टाकूं लागला होता. त्याच्या पोंवळ्यासारख्या लाल ओंठाआड हिरकणीसारखे दोन दांतही डोकावूं लागले होते. त्यानिमित्त गांवांतील सर्व लहान मुलांना व त्यांच्या मातांना वाड्यांत आमंत्रण होतें. समारंभासाठीं बागेंत बैठक घातली होती. मध्यभागीं मखमलीनें मढविलेल्या चांदीच्या चौरंगावर बाळाला बसवून पांच सुवासिनींनीं त्याला ओवाळलें. नंतर त्याच्या डोक्यावर रुप्याचें तबक धरलें व त्यावरून बोरांचा वर्षाव केला. आमंत्रित मुलें तीं बोरें वेचूं लागलीं. बाळही त्यांना हातभार लावण्यासाठीं धडपडूं लागला. नंतर खारका, बदाम, जर्दाळू यांचा याच क्रमानें वर्षाव करून व इतर फळें, फुलें पुढें ठेवून तीं मुलांकडून लुटविलीं. नंतर बाळाला पांच पावलें चालवून त्याच्या हातून पांच मुलांना मोदक देवविले. नंतर इतर मुलांना एका बाईनें दिले.

आपल्या खिडकींतून वृद्ध हा समारंभ पाहत होता. बालकांची लीला पाहून क्षणमात्र त्याच्या मुद्रेवर हास्यरेषा उमटली. लगेच त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. कपाळावर आंठयांची गर्दी झाली व मुद्रा गंभीर झाली. पूर्वस्मृतीमुळें म्हणा, किंवा इतर विचारतरंगांमुळें त्याला तें दृश्य पाहवेना. त्यानें आपली खिडकी लावून घेतली. तरुणीच्या दृष्टींतून त्याची हालचाल निसटली नाहीं. तिनें आमंत्रित सुवासिनींना हळदकुंकू व फळेंफुलें देऊन

समारंभ आटोपता घेतला आणि मुलाला हुजऱ्याच्या स्वाधीन करून ती वर गेली. आपल्या पलंगावर पडून वृद्ध अश्रुमोचन करीत होता. त्याच्या उशा-लगत जमिनीवर बसून तरुणी म्हणाली,

" बाबा ! बाबा ! "

आणि ती स्फुंदून रडूं लागली. आपलें दुःख आवरून वृद्ध म्हणाला,

" बाळे ! असं कधीं कधीं अगदीं असह्य होतं. मन भांबावून जातं आणि ईश्वर क्षमा करील कीं नाहीं असं वाटूं लागतं. "

तरुणी विस्मयानें चमकून म्हणाली,

" क्षमा कशाबद्दल, बाबा ? आपण काय चूक केली ? "

वृद्ध अडखळत म्हणाला,

" जाणून तर केली नाहीं. पण नकळत–चुकलों तर नाहीं ? असं वाटतं मनाला–"

वृद्धाला आपल्या मनांतील उद्देश शब्दांनीं नीट व्यक्त करतां आला नाहीं तरी त्याचा भावार्थ तरुणीच्या हृदयाला कळला. ती निश्चयी मुद्रेनें वर पाहून तीक्ष्ण स्वरानें म्हणाली,

" बाबा ! "

या दोनच अक्षरांत वृद्धाला उत्तर होतें. दोष ध्वनित केलेला होता, सर्व कांहीं होतें. ज्या वृत्तीनें वृद्धानें कांहीं उद्गार काढले होते त्या वृत्तीला नम-विण्याचें सामर्थ्य या दोन अक्षरांत पुरेसें होतें. तरुणी रडूं लागली आणि वरकांती आनंदी व सुखी दिसणाऱ्या स्त्रीचें दुःख किती गूढ व असह्य असतें याचा प्रत्यय येऊन वृद्धाला वाईट वाटलें. त्यानें तिचें मृदुपणें सान्त्वन केलें.

## [ ३ ]

दिवसेंदिवस बाळ मोटा होत गेला. योग्य काळीं त्याच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली. शिक्षक त्याच्या तल्लख बुद्धीची तारीफ करीत.

'इतक्या लहान वयाचा, असा चौकस विद्यार्थी आपण पाहिला नाहीं,' असें म्हणत. नोकरचाकरांचाही तो लाडका होता. पशुपक्षीही त्याच्यावर प्रेम करीत. त्याला हरिणाची गाडी हौसेनें करविली होती. तींतून फिरून आल्यावर तें हरिण खालीं न बांधतां वर आपल्या दिवाणखान्यांत पोपटाच्या पिंजऱ्याजवळच बांधण्याचा तो हट्ट धरीत असे. त्याचें सर्वांवरील सारखें प्रेम व आचरण यांतील विशुद्धता पाहून त्याच्या मातेला खरें सान्त्वन लाभत असे. वृद्धाच्या दुःखावरही त्यामुळें दडपण पडे. बाळाचें प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर पुढील शिक्षणासाठीं त्याला 'सरदार्स सन्सस्कूल'मध्यें पाठविण्यांत आलें. त्या वाड्यांत पुन्हा स्तब्ध, उदास वातावरण पसरलें. सुटींतसुद्धां तो घरीं न येतां निरनिराळीं प्रेक्षणीय स्थळें पाहावयास जाण्याची परवानगी विचारी, आणि त्याच्या इच्छा, आनंद यांत सौख्य मानणाऱ्या त्या वृद्ध तरुण पितरांकडून ती दिली जाई. मुलाला इकडे येण्याची तितकी उत्सुकता नसतां त्यास सक्तीनें यायला लावून आपल्या उदास वातावरणाची आंच लावणें त्यांना प्रशस्त वाटत नसे.

परंतु सर्व काळ कांहीं सारखा नसतो. कांहीं वर्षें गेल्यानंतर मुलाला तांतडीनें बोलावणें भागच झालें. दिवसमानाप्रमाणें वृद्धाची प्रकृति खालावलेली होतीच. एकदा पावसाळ्याच्या दिवसांत ती फारच बिघडली. तरुणी अतिशय घाबरून गेली, व तिनें मुलाला आणावयास कारभाऱ्याला पाठविलें. बाळाची भेट होईल कीं नाहीं, याविषयीं सर्वांस शंका वाटत होती. चिन्तेनें पोखरलेल्या व प्रकृतीनें खालावलेल्या वृद्धालाही जीविताची शाश्वती वाटत नव्हती. त्यामुळें मुलाला शेवटचें पाहण्याची उत्कंठा अतिशय वाढली होती. दर घटकेला प्रयासानें डोळे उघडून 'कुमार आला का?'' अशी क्षीण स्वरानें तो चौकशी करी. जणूं काय त्याच्या दर्शनासाठींच त्यानें जीर्ण शरीरांत प्राण रोधून धरले होते! शेवटीं एके दिवशीं तो आला. बाहेरून मोठ्या प्रकाशांतून आल्यामुळें प्रथम त्याला नीट दिसलें नसावें; डोळ्यांवर आडवा हात ठेवून किलकिल्या डोळ्यांनीं पाहत तो हळूच दारांत येऊन उभा राहिला. त्याची

आई रुग्णपरिचर्येंत गुंतलेली असल्यामुळें दाराकडे तिची पाठ होती. परंतु रुग्णाचा पलंग अशा रीतीनें ठेवला होता कीं, दाराकडील दृश्य त्याला दिसावें, परंतु प्रकाशाचा त्रास होऊं नये. त्यामुळें वृद्धाची दृष्टि तत्क्षणीं त्यावर गेली. किरकोळ शरीरयष्टीच्या लहान कोमल बाळाऐवजीं उंच, भव्य, सुदृढ, सुंदर युवक त्याला दिसला. त्याची पूर्वस्मृति जागृत झाली. तिनें त्याला उत्तेजित केलें; आणि—

"सुधा, सुधा, तूंच ! तूंच का आलास, माझ्या बाळा ? ये, ये," असें एकदम ओरडून व बाहु पसरून तो ताडकन् बिछान्यावर उठून बसला. वृद्धाचे आवेशाचे उद्गार ऐकून तरुणी मोठ्यानें दचकली. डॉक्टरनें सांगितलेली आणीबाणीची वेळ ती हीच असें वाटून ती घाबरून गेली. कावऱ्याबावऱ्या मुद्रेनें सभोवार पाहूं लागली, आणि जवळ येणाऱ्या आपल्याच मुलाकडे दृष्टि जातांच ती धाडकन् मूर्च्छित पडली. कुमार घाबरून गेला. गडबडीमुळें नोकरचाकर धांवून आले. डॉक्टरला बोलावण्यांत आलें व उपचार करून तिला सावध करण्यांत आलें. वृद्धाच्या हृदयांतील चिन्तेचा अग्नि बाळाच्या सुधातुल्य दर्शनानें विझून गेला. ज्या भेटीच्या प्रसंगाला डॉक्टर व सर्वजण भीत होते तो पार पडला. त्या दिवसापासून वृद्धाच्या प्रकृतींत कल्पनेपलीकडे फरक पडत चालला; व हृदयावरील अज्ञान दडपण दूर झाल्यासारखें तरुणीला वाटूं लागलें. परंतु कर्तव्यतत्पर मुलाच्या मनांत वृद्ध पित्याविषयीं आदराचा ओलावा बिलकूल नाहीं, याची जाणीव अनुभवी वृद्धाच्या बुद्धीला झाल्याशिवाय राहिली नाहीं.

दीर्घकाळाच्या तळमळीनंतर नुकत्याच अनुभवलेल्या निर्भेळ समाधानानें त्याच्या हृदयाची तृप्ति झाली होती. त्यामुळें त्याची वृत्ति आदर–अनादराची पर्वा करण्यापलीकडे गेली होती. परंतु ज्या कोमल बालिकेला क्षणिक चुकीबद्दल सर्व जीवित सन्यस्त वृत्तीनें कंठावें लागलें होतें, त्या साध्वी तरुणीविषयीं मुलाची अशी अनादरवृत्ति झालेली तिच्या जर प्रत्ययाला आली तर तिला मरणप्राय दुःख होईल; ज्याच्यासाठीं– ज्याच्या कल्याणा-

साठीं तिनें हें सारें सहन केलें, त्याच्याकडूनच हृदयावर आघात झाल्यावर तिचे प्राणच नष्ट होतील; आणि मायलेंकरें दोघेंही दुःखी होतील. असा अक्षम्य अन्याय होऊं नये म्हणून हें आत्मकथन मी लिहून ठेवीत आहें. मुला, ही करुण कहाणी कोणाची, हें आतां तुला कळून चुकलेंच असेल. आतां सोबत आपल्या वडिलांचा फोटो पाहा, व शंका असल्यास फेडून घे."

* * *

कुमारांनीं ती प्रतिमा उत्सुकतेनें पाहिली. आपल्याशीं असलेलें तिचें विलक्षण साम्य पाहून ते फारच चकित झाले ! त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. हात थरथर कांपूं लागले. धांवतच ते आईच्या खोलींत गेले; आणि तिचे कृश पाय अश्रूंनीं भिजवीत म्हणाले,

" आई, आई ! मला क्षमा करा. तुमच्या देवतातुल्य हृदयाला मीं व्यर्थ कष्ट दिले. आई, मी चुकलों. तुमच्याबद्दल होत असलेल्या अन्यायाचें क्षालन करण्याकरितां ज्यांनीं हें अलौकिक आत्मदमन केलें त्या शुद्धात्म्याला माझ्या आजोबांच्या पवित्र पदकमलांना, हें पाहा मीं त्रिवार वंदन करतों ! "

---

## सर्पांची छाया : : ८

'आमची लीलाताई भारीच हळव्या मनाची बरं कां!' दोन दिवसापूर्वी पाहुणी आलेल्या माझ्या बाल मैत्रिणीनें वरील वाक्य उच्चारतांच जवळ बसलेल्या एक दोन शेजारणींनीं प्रश्न केला,

'का? काय झालं आज?'

'एका बाईनें जीव दिल्याची बातमी वर्तमानपत्रांतून आज सकाळीं भाऊजींनीं वाचून दाखविली तर हिच्या डोळ्यांना आपलं पाणी आलं.'

'मावशी, आईचं असंच आहे.'

माझी मुलगी मालू माहिती देऊं लागली.

'वाचून दाखवायला सांगते, पण कादंबरींतले काल्पनिक करुण प्रसंग ऐकून तिला आपलं रडूं येतं! मागं मी तिला 'डॉल्स हाउस' वाचून दाखवलं तेव्हां शेवटीं अशीच रडली!'

सर्वजणी हसूं लागल्या. मी ओशाळून म्हणालें,

' होय बाई, आहे खरं असं. मला आपलं असलं कांहीं सहनच करवत नाहीं. '

' कथा कादंबऱ्यांतल्या काल्पनिक गोष्टी सहन करवत नाहींत, मग खऱ्या घडलेल्या तसल्या गोष्टी ऐकून तुला काय वाटेल ? '

' खरोखरच वाईट वाटेल. माझ्या अंगावर बाई शहारे येतात अगदीं, खरंच उठल्यासुटल्या'ह्या बायका जीव कसा हो देतात ? '

' चूक आहे तुझी लीलाताई. वाटतं आपल्याला तसं. पण बायका उठल्यासुटल्या नाहीं जीव देत. परवांच मी कुठंसं वाचलं, बायकांपेक्षां आत्महत्या करणारे पुरुषच अधिक आढळतात. अन् अगदीं क्षुल्लक कारणानं ते जीव घालवतात ! '

शारदाबाईची ही विचारसरणी आह्मांपैकीं कोणालाच पटली नाहीं. अविश्वासाच्या नजरेनें आम्हीं त्यांच्याकडे पहातच राहिलों. तें लक्षांत येऊन त्या पुढें म्हणाल्या,

' तुम्हाला माझं विधान धाडसाचं वाटतं, पण खरंच सांगतें ज्या कारणासाठीं पुरुष जीव देतात ती दूर करण्यासारखीं–दुरुस्त करण्यासारखीं असूनहि तसं न करतां भावनावशतेविषयीं प्रसिद्धी पावलेल्या स्त्रियांपेक्षांहि अधिक भावनावश होऊन ते असलें साहस करतात. उलट बायका सोशिकपणाची शिकस्त करतात. संकटाच्या काळ्याकुट्ट ढगांकडे सुद्धां त्यांची दृष्टि आशेनें पहाते. अगदीं अनन्यगतिक झाल्याशिवाय सहसा त्या असलं साहस करीत नाहींत. '

शारदाबाईचा मुद्दा आम्हां कोणालाच पटत नव्हता. वाद मिटविण्याच्या उद्देशानें मी म्हणाले,

' जाऊं देना ताई, या वादाशिवाय आपलं कांहीं अडलं आहे का ?

' हं हें बरीक खरं. ' त्या दुःखपूर्ण स्वरांत म्हणाल्या.

' मग असली बातमी ऐकून दोन अश्रुबिंदु टाकल्याशिवाय तरी काय अडलं होतं ? '

भावनेच्या वादाविषयीं बोलतां बोलतां ताई स्वतःच भावनावश होऊन बोलत होत्या. त्यांचा स्वर कंपीत झाला होता. माझ्या बोलण्यानें त्यांना दुःख झालें. उघड दिसत असतांहि काय बोलावें हें मला कळेना, इतक्यांत माझी मुलगी पुढें सरून म्हणाली.

‘ मावशी तुम्हांला टाऊक आहे का अशी एखादी गोष्ट, अगदीं अनन्य-गतिक झालेल्या एखाद्या बाईची ? ’

“ हं. ”

दुःखपूर्ण लांब सुस्कारा सोडून त्या तिजकडे पहातच राहिल्या. आम्ही उत्तेजित स्वरांत म्हणालों,

‘ खरंच ताई, अशी एखादी गोष्ट तुम्हांला माहिती असली तर आम्हांला सांगाना. ’

ताईंनीं तें कबूल केलें. परंतु तितक्यांत आमच्या दाराशीं टांगा उभा राहिला व एक परगांवचे गृहस्थ खालीं उतरले. अर्थात पाहुण्यांचें आदरातिथ्य करणें हें माझें अवश्य कर्तव्य होतें. त्यामुळें गोष्ट राहिली.

रात्रीं झोपण्याच्या वेळीं ताई म्हणाल्या,

“ लिलूताई, मी सकाळच्या गाडीनें जाईन म्हणतें. ”

“ तें कां ? महिना पंधरा दिवस विश्रांती घेण्यासाठीं आलां होताना तुम्हीं ? मग चार दिवस तरी झाले का ? ”

“ ते खरं. पण मला आतां गेलंच पाहिजे. ”

“ म्हणजे ? असं काय निकडीचं काम निघालें एकाएकीं ? तें कांहीं नाहीं. आतां महिनाभर मी कांहीं तुम्हाला सोडणार नाहीं. जमलंच तर आतां आपल्या मालूचं लग्नाचं जमेल. तेव्हां तुम्हांला आतां राहिलंच पाहिजे. आपल्याकडं आलेले पाहुणे पाहिलेत ताई ? ते मुली पाह्यला निघालेत. आपल्या मालूचं जमलं तर वाईट नाहीं, नाहीं ? ”

मी आपल्याच आनंदांत असल्यामुळें माझें बोलणें ऐकून ताईनाहि आनंद होईल असें मला वाटलें. परंतु माझें बोलणें ऐकून, एखादी कळी कुणी

कुस्करून टाकीत असतां ज्या तऱ्हेच्या वेदना मनाला होतात, व अंग थरारतें तशा तऱ्हेचा भाव मुद्रेवर आणून त्यांनीं आपलें शहारलेलें अंग झाडलें. आणि चमत्कारिक स्वरानें त्या उद्गारल्या,

" मालूसाठीं का हे ? वाटलंच मला ! बरं, मग राहीन मी. अन् तुला माझी गोष्टहि ऐकायची आहे नाहीं का ? "

वास्तविक मालूला दाखवून तिच्या होऊं घातलेल्या लग्नाच्या प्रश्नापुढें मला गोष्टीची एवढी गोडी नव्हती. परंतु तसें न दाखवितां मी म्हटलें,

" हो हो, खरंच, गोष्टसुद्धां ऐकायची आहे. लग्न बिग्न उरकल्यावर निवांतपणीं —"

पण ताई एवढ्या चमत्कारिकपणें हंसल्या कीं त्यामुळें मला माझें वाक्य पूर्ण करवलेंच नाहीं. ताई म्हणाल्या,

' मालूला योग्य नवरा आहे का हा ? त्याचं वय किती आहे असं वाटतं तुला ? '

' वय ? असेल—बिजवरच आहेत. पण मग काय करायचं ? मालू तरी लहान आहे कां ? हें सत्रावें वर्ष तिला ! '

आमच्या घरीं एकत्र चहापानाची पद्धत होती. त्याप्रमाणें सर्व सिद्धता झाल्यावर पाहुण्यासह दिवाणखान्यांत आले त्यावेळीं ताईकडे दृष्टि जातांच पाहुणे केवढ्यानं तरी दचकले, आणि जेव्हां परिचय करून तिला तेव्हां त्याबद्दल एकानेंहि औत्सुक्य किंवा आनंद व्यक्त केला नाहीं. त्यांच्या तोंडावर बेपर्वाइची छटा उमटलेली होती. मला वाटलें त्या दोघांचा परिचय असेल; परंतु तसें दोघांनींहि आपल्या वर्तनांत कांहींच दर्शविलें नाहीं.

' चहाच्या व जेवण्याच्या वेळीं पाहुण्यांच्या दृष्टीस मालू पडलीच होती, यावेळीं पाहुण्यांच्या मुखावर समाधानाचें स्मित झळकलेलें दिसलें. त्याच रात्रीं ते आपल्या गांवीं निघून गेले. घरीं पोंचल्यावर कांहीं दिवसांनीं त्यांच्याकडून संमतीदर्शक पत्र येईल अशी आमची अपेक्षा होती. मनाला एकप्रकारची उत्कंठा लागून राहिलेली असल्यामुळें कामाकडे किंवा वाचनाकडे

तितकेसें लक्ष लागत नव्हतें. तेव्हां वेळ जाण्यासाठीं त्या दिवशीं तहकूब राहिलेली गोष्ट आज सांगण्याचा ताईना मी आग्रह केला. व त्यानींहि आढेवेढे न घेतां सांगण्यास सुरवात केली.

* * *

" माझ्या मामाची मुलगी निर्मला माझ्याहून लहान होती तरी आमचं फार सख्य असे. आपण खूब शिकून असें करूं, तसें करूं, इत्यादि बेत ती व मी एकमेकींत बोलत असूं. पण इंग्रजी शिकण्यास प्रारंभ करून दोन वर्षे झाली नाहींत तोंच तिला पुढें शिकण्याची बंदी करण्यांत आली. मीच तिच्या डोक्यांत शिकण्याचें व अप्रत्यक्ष रीतीनें अविवाहित रहाण्याचें भलतेंच वेड भरवून देतें असा मामा मामींचा ग्रह झाला होता. त्यांचा माझ्यावर एकप्रकारें रोषच होता असें म्हटलें तरी चालेल. त्यामुळें मोठ्या कष्टानें मला माझा निमूशीं असलेला स्नेह मर्यादित करावा लागला. आमच्या भेटीं गांठीं कारणपरत्वेंच पडत.

मी तेव्हां मेडिकल कॉलेजमध्यें शिकत होतें. एके दिवशीं खुद्द मामीकडूनच मला बोलावणें आलें. त्याप्रमाणें मी गेलें असतां त्या एकट्याच तांदूळ निवडीत बसल्या होत्या. मला पहातांच काळजीच्या स्वरानें त्या म्हणाल्या,

' ये बाई, बरी आलीस. '

मी भीत भीत विचारलें.

' कां कोणी आजारी आहे कीं काय ? '

' वाः, डॉक्टरीण व्हायची आहेस अजून. इतक्यांतच नको एवढा आजाऱ्यांचा ध्यास घ्यायला ! '

मामीच्या टोमण्यानें ओशाळून मी म्हणालें,

' मग कशाला बोलावलं ? निमू कुठं आहे ? '

' ती आहे आपल्या खोलींत. तिच्यासाठींच बोलावलं तुला. '

मामींचें पुढचें बोलणें ऐकायला मी थांबलेंच नाहीं. तडक मी निमूच्या खोलीकडे वळलें. माझा हात धरून आर्जवी स्वरांत त्या म्हणाल्या,

' अग पण माझं जरा ऐकशील का ? बघ, कसं सोन्यासारखं स्थळ आलं आहे चालून. पण ही आपली त्रागा करून बसली आहे. म्हणते, मुद्रा क्रूर अन् डोळे कायसेसे. काय तरी बाई एक एक नवीनच. चांगले डॉक्टर आहेत. पण परीक्षा पास झाली नाहीं म्हणून इंग्रजी औषधांचं दुकान चालवतात. एजंट का कायसे व्यापारी आहेत म्हणे. हुंड्याशिवाय पत्करतात तिला. म्हणतात ना, दैव देतं पण कर्म नेतं. त्यांतली गत. म्हणून म्हणतें जरा तिची समजूत घालशील का ? '

मी पुढें ऐकायला थांबलेंच नाहीं. तडक निमूच्या खोलींत शिरलें. मला पहातांच तिनें हंसण्याचा प्रयत्न केला, पण दुःखी मुद्रेवर तें हास्य भेसूर दिसलें. तरीहि मी थट्टेनें म्हणालें,

' अहाहा ! काय पण अवतार धारण केला ग ! लग्न जमलं म्हणजे असं दुःखाचं ढोंग करावं लागतं हें नव्हतं माहीत मला. '

" ताई ! "

स्वर केविलवाणाच पण त्यांत एक प्रकारचें तीक्ष्णत्व होतें. तें मला चांगलेंच जाणवलें. मी चमकून तिच्याकडे पाहिलें.

" ताई, सगळ्यांनीं एकमत केलंच आहे. पण तुझ्यावर माझी मदार, ती तूंच—"

काय असेल ते असो तिचें लग्न जमलें आहे आणि जरा बऱ्याशा माणसाशीं जमलें आहे, या गोष्टीचा मला आनंद झाला होता. त्याशीं विसंगत अशी तिची मुद्रा पाहून मला हंसूं आलें, मोठ्यानें हंसतच मी पोक्तपणानें प्रश्न केला—

" अग पण झालं काय ? एवढं वाईट काय वाटतं तुला ? सांगशील कीं नाहीं. "

" मला हें लग्न व्हायला नको. "

" तें कां ? अशीच राहण्याचा विचार आहे वाटतं. "

" माझ्या विचाराला महत्त्व असतें मग काय पाहिजे होतें ? कांहीं असलं तरी ह्या व्यक्तीशीं नको. "

" का बरं ? लंगडी, पांगळी किंवा आंधळी आहे वाटतं स्वारी ? "

" अहं ! पण–"

" मग काय बेकार आइतखाऊ ? "

" नाहीं. चांगली स्वावलंबी, धडधाकट आहे पण मला आवडत नाहीं."

" परिचय आहे वाटतं आधींचा ? "

" छे, मुळींच नाहीं. "

" आतां मात्र शर्थ झाली हो निमू ! जो माणूस स्वावलंबी अन् चांगला धडधाकट आहे असं तूंच कबूल करतेस अन् त्याला तूंच नाकारतेस ? मग यापेक्षां कसा मनुष्य असावा असं तुसं म्हणणं ? ऐकूं दे तरी ! "

" ऐकायचं काय ? पाहिल्या बरोबर ग्रह बरा झाला नाहीं एवढं खरं ! "

" शक्य आहे ! नेहमीं प्रथमदर्शनीं प्रेम जडल्याचीं वर्णनं पुस्तकांतून आढळतात, तशींच प्रथम दर्शनीं तिरस्कार उत्पन्न झाल्याचींहि आढळतात ! हेंहि त्यांतलंच. मग पाहिलीच पाहिजे ही व्यक्ति. "

' पहा म्हणजेच समजेल. '

' पहातेंच. पण मला ती व्यक्ति आक्षेपार्ह वाटली नाहीं तर तूं लग्नाला कबूल होशील ना ? '

' तुला मुळीं पसंतच पडणार नाहीं. '

' समज पडली, तर ? '

' तर पाहीन. '

' पाहीन नाहीं. कबूल कर. '

' कबूल कसं करतां येईल ? घाईमुळं किंवा आग्रहामुळं एकदां चूक झाली, तर बदलतां येण्यासारखी कां ही गोष्ट आहे ? वाटतं कीं जन्मभर टिकणारी गोष्ट चांगली विचारपूर्वक करावी. कोणाचा आग्रह किंवा इच्छा यांना बळी

न पडतां आपल्या आवडी, इच्छा यांना उत्तेजन मिळून संवर्धन होईल.'

'समजलं ! तुझ्या काव्यानिर्मितींत व्यत्यय येऊं नये हेंच ना ? पण एकमेकांचे व्यवसाय निरनिराळे आहेत अशांचीं लग्नं काय सुखावह होत नाहींत ? उलट मीं म्हणतें या दृष्टीनें हें स्थळ चांगलं आहे. त्यांनीं त्यांचा व्यवहार बघावा, तूं तुझा व्यवहार चालवावा. एकाचा उपसर्ग दुसऱ्याला नाहीं. शिवाय दोघांचं राज्य ! तें असो म्हणा, पण तूं कबूल झाल्यानें मामांच्या शिरावरचं ओझं किती सुलभतेनं हलकं होणार आहे. ते हुंडा वगैरे कांहीं घेणार नाहींत. मघांच मामी म्हणत होत्या, 'आम्ही थकत चाललों. कसलाच आधार नाहीं. वेळेवर पोर ठिकाणीं पडली तर एवढी वाढवली, शिकवली त्याचं सार्थक होईल !'

मला तत्त्वज्ञान सुचत चाललें होतें. पोक्तपणाच्या आविर्भावानें मी तिला उपदेश करूं लागलें,

'तूं मुलगा असतीस किंवा त्यांना हातभार लावण्याइतकी शिकलेली असतीस तर गोष्ट वेगळी !'

ती जोरानें म्हणाली,

"पण हा काय माझा दोष ? मला शिकायची किती हौस होती. ज्या शिक्षणाला जगांत कांहीं किंमत आहे, इतकं मला शिकवलं असतं तर त्यांच्या उतारवयांत त्यांना मुलाची वाण भासूं देण्याइतकी मी कृतघ्न झालें असतें असं का तुला वाटतं ?"

"नाहीं, पण आतां तुझ्या हातीं आहे तें तर तूं करशील कीं नाहीं ?"

जणूं काय तिच्या संमतीवरच ते अडून बसले आहेत असेंच मी तिला भासविलें.

'चांगलं स्थळ मिळायला कोण मारामार पडते. हें चांगलं खातंपितं घर आहे. आतां शिक्षण फार झालं नाहीं, पण व्यापार हा काय तूं कमी समजतेस ? व्यापाराच्या वाढीवरच देशाची सुस्थिति अवलंबून असते !"

मामींनीं पटविल्याप्रमाणें मी वकिली तर छान केली व ती फुकटही गेली नाहीं. एक दीर्घ सुस्कारा सोडून ती शुष्कपणें म्हणाली,

' ठीक आहे. '

तिचा तो स्वर असहायतादर्शक वाटला. मी आश्वासनाच्या स्वरानें म्हणालें,

' अशी ही होऊं नको. मामा तुझें कांहीं वाईट करणार नाहींत. शिवाय मी जाऊन पहाणारच आहें. '

ती म्हणाली ' बरं. '

काय असेल तें असो. लग्न जुळवावयाचें म्हटलें कीं, लहान असो, मोठा असो, प्रत्येकाला अगदीं मोठी हौस वाटते. ' अमक्या अमक्याचें लग्न मी जुळवलें, ' ' तमक्याची विवाहग्रंथी घट्ट बांधायला माझे श्रम कारणीं लागले–' इत्यादि प्रौढी मिरविण्याची माणसाला जात्याच मोठी आवड असते. दुसऱ्याचें लग्न जुळविण्याच्या आवडीच्या मुळाशीं असलेल्या अनेक हेतूंपैकीं आपली चार दिवस चौमुखीं वाहवा व्हावी एवढ्या एकाच हेतूच्या पूर्ततेसाठीं दुसऱ्याच्या भविष्याचा तादृश विचार न करतां त्यांना विवाह-शृंखलेनें बद्ध करण्यासाठीं माणसें झटत असतात. मीहि याला अपवाद नव्हतें. निमूची अनिच्छा स्पष्ट कळत असतांहि आवडीमुळें म्हणा किंवा मामामामींचा लोभ संपादन करून घेण्याच्या लालसेमुळें म्हणा, त्या व्यक्तीला पाहून निमूचें मन वळविण्याचें मी ठरविलें.

बिचारी निमू ! माझ्यावर विसंबून स्वस्थ होती. जणूं काय तिच्याप्रमाणें मलाहि मुद्रेवरून मनुष्याची पारख करण्याचें ज्ञान आहे असेंच तिला वाटलें असावें. ठरल्या वेळीं मी वरपरीक्षा करून माझें अनुकूल मत जाहीर केलें. झालें, निमूचा निरुपाय व माझा गौरव झाला. वास्तविक माझ्या अनुकूल प्रतिकूल मतांचें त्यांच्या दृष्टीनें मोठेंसें महत्त्व होतें असें नाहीं. मी प्रतिकूल मतप्रकट केलें असतें तरी त्यांनीं करायचें तें केलेंच असतें. माझ्या अनुकूल

मतप्रकटीकरणानें त्यांचें माझ्याविषयींचें मत निवळलें इतकेंच. मताधिक्यामुळें पोरीचें कांहीं न चालून एकदांची ती विवाहशृंखलेनें बद्ध झाली.

तिचें लग्न जमवायला उत्तेजित होऊन हौसेनें मी पुढाकार घेतला होता खरा. पण आधीं प्रतिकूल असलेल्या निमूनें जेव्हां एखाद्या गरीब गाईप्रमाणें सर्वांच्या आग्रहापुढें निमूटपणें मान वांकविली तेव्हां मी जरा मनांत चरकलेंच. मला वाटलें आतां ही पोर पुढें कशी वागते कोणास ठाऊक. पण आश्चर्य असें कीं, प्रथम ज्याच्या विषयीं जिनें इतकी अरुचि दाखविली, त्या नवऱ्याचा थोडा जरी उणेपणा कोणी दाखविला तर तो तिला खपत नसे! त्याच्या अगदीं उलट मामांची गोष्ट होती. लग्नापूर्वी हिऱ्यासारखा भासणारा जांवई आतां त्यांना कवडी किंमतीचा वाटत होता. ड्रेस घ्यायचीं आहेत, फर्निचर घ्यायचें आहे, इत्यादि निरनिराळया निमित्तानें मोठमोठ्या थापा मारून त्यानें सासऱ्याला बरेंच लुबाडलें होतें आणि हुंड्याशिवाय झालेलें हें लग्न आतां त्यांना बरेंच महाग पडलें होतें; त्यामुळें ‘ वड्याचें तेल वांग्यावर ’ या न्यायानें मुलीवर त्यांचा राग होता.

एकदां बोलण्यावरून बोलणें निघून तिच्या नवऱ्याच्या दुटप्पी, थापेबाज वर्तनाबद्दल आम्हीं हंसून बोलत होतों. तेव्हां ती उसळून म्हणाली,

“ अवघ्या आठ महिन्यांत तुमचींच मतं बदललीं. जें माणूस यापूर्वीं सर्व सद्‌गुणांचं माहेरघर वाटत होतं तें आतां दोषांचं आगर वाटतं, हा तुमचाच दुटप्पीपणा नाहीं काय ? ”

“ पण दिसतं तसं बोलायला काय हरकत आहे ? त्यांचे दोष तूं सुधारावे म्हणून ना आम्हीं तरी त्याची चर्चा तुझ्याजवळ करीत आहोंत ? ”

“ मी सुधारावे ? ”

‘ मी ’ शब्दावर जोर देऊन ती म्हणाली,

“ म्हणजे मला काय शिक्षिका समजतां कीं काय ? सुधारण्याचा काळ निघून गेलेला आहे. तेव्हां एवढी कळकळ वायां न घालवाल तर बरं.

तुमच्या कळकळीचाहि काळ निघून गेलेला आहे, मनुष्यस्वभाव बदलणं कठीण. तेव्हां आहे तेंच चालवून घेणं मला भाग आहे. ”

तिच्या आवाजांतील तीक्ष्णत्व व मुद्रेवरील भाव पाहून थट्टेचें प्रत्युत्तर जिव्हेवर आलेलें तसेंच विरून गेलें. तिच्या बोलण्याच्या आविर्भावावरून तिच्या मनांतील आमच्यावरील राग तर प्रतीत होत होताच, पण नवऱ्याविषयीं ती बोलत होती ती अनुरागानें कीं तीव्र निराशेनें हें एक कोडेंच वाटत होतें.

“ हजार हिकमती करून तो पाजी मला सारखा लुबाडतो आहे अन् ही त्याची कड घेऊन मला ज्ञान शिकवते आहे. म्हणे मनुष्य अन् मनुष्यस्वभाव. मनुष्य कसला, शुद्ध पशू आहे तो ! हिंस्र पशू ! ”

“ पण बाबा ! हें तुम्हांला यापूर्वीच कळलं असतं, तर बरं नसतं का झालं ? म्हणजे तुम्हीं आपली गरीब गाय तरी जबड्यांत लोटली नसती ! ”

तापलेल्या कांचेवर दोन पाण्याचे थेंब पडून ती तडकावी, तसें तिनें शांतपणें उच्चारलेल्या वरील वाक्यानें झालें.

मामा त्वेषानें ओरडले,

“ चालती हो येथून. दुष्ट कुठली. ”

मामींनीं व मी तिला हातांला धरून दुसऱ्या खोलींत नेली. त्याच संध्याकाळीं ती आपल्या घरीं गेली. ती पुढें कधींच माहेरीं आली नाहीं. यावरून आमच्या घरीं जेव्हां कधीं तरी ती येत असे तेव्हां तिला थट्टेनें मी जिजाबाई म्हणत असें.

* * *

आणखी चार पांच वर्षे लोटलीं, निमा माहेरीं आली नाहीं. तरी तिचा वैवाहिक जीवनक्रम सुखानें चालला आहे अशीच आम्हां सर्वांची समजूत होती. पण एक जोराचा धक्का बसून त्या स्वप्नांतून आम्हीं जागीं झालों. एकदां मध्येंच घाबऱ्या घाबऱ्या मामा घरीं आले व निमा फार आजारी असल्याचें सांगून, आम्हांला बरोबर घेऊन तिच्याकडे निघाले. मोठी

चमत्कारिक मनःस्थिति झाली होती आमची. 'कसें असेल काय असेल !' अशा साशंक अधीरवृत्तीनें परंतु आशातुर मनानें आम्हीं तेथें गेलों तों काय ? निमूचें झांकून ठेवलेलें शव आमच्या दृष्टीस पडलें. मामी आर्त स्वरानें ओरडल्या--

'शेवटीं हें पहातें. इतकी आजारी होती तरी कळवलं नाहीं, एकदां भेटलें तरी असतें.'

तिचा नवरा साळसूदपणानें म्हणाला, 'काय करावं? ती नको म्हणत होती.'

मुलीनें शेवटपर्यंत आपणावर राग ठेवला, अंतकाळींहि आपली भेट घेतली नाहीं. याचें मामींना फार दुःख झालें. मामी ओक्साबोक्सी रडूं लागल्या. ते ऐकून शेजारच्या कांहीं स्त्रिया तेथें आल्या व म्हणाल्या,

'रडतां कशाला ? बरं झालं, सुटली बिचारी हालांतून !'

तिला एकीकडे घेऊन हळूच मी विचारलें,

'इतके का तिचे हाल झाले ? असं काय दुखणं झालं होतं तिला ?'

'शारीरिक रोग कोणताच नव्हता. हृद्रोग होता मोठा. त्यांतून तिनंच आपली सुटका करून घेतली.'

निमूचा हात पांघरुणाबाहेर काढून तिनें तिचीं काळीं पडलेलीं नखें मला दाखविलीं.

"अगबाई, विष !"

"होय, दुःखाला कंटाळून शेवटीं तिनं–"

"पण असं दुःख तरी काय होतं ?"

"पुष्कळच होतं. अन् पुष्कळ तऱ्हेचं होतं. मारहाण छळ जाच सर्व कांहीं होतं. सकाळपासून दुपारपर्यंत बरी होती. अन् लगेच कण्हूं लागली. मी येऊन पाहिलं तों अगदीं तळमळत होती. तेव्हांच मी समजलें, अन् दोष दिला. तेव्हां म्हणाली,

"पुष्कळ सोसलं. आतां सोसवेना. कुठंच आधार नाहीं. पायांवर उभं

राह्यला पुरतं शिक्षण नाहीं. विरंगुळ्याला पोटीं मूलबाळ नाहीं. मानहानी अन् अपकीर्ति, त्यापेक्षां मीच मार्गांतून दूर सरलें तर बरं. ”

“ एवढं सांगायला तिला कितीतरी प्रयास पडले. बरंचसं खुणांनीं सांगितलं. अन् सांगायला कशाला पाहिजे ? आम्ही पहात नव्हतों कां ? बाहेरच्या अन् दारूच्या नादापायीं बिचारीचा बळी पडला. बिचारीला भारी वाईट वाटे. आपल्यासारखी सुरेख बायको असतां, नवऱ्याला बाहेरचा नाद असावा याचं तिला भारी वाईट वाटे. त्यानें लाजच सोडली होती. पण त्याची अपकीर्ति होऊं नये म्हणून ती——”

मामी गुडघ्यांत मान घालून रडत होत्या. आमची कुजबूज ऐकून त्या कावऱ्या बावऱ्या झाल्या आणि केविलवाण्या दृष्टीनें काय झालें तें विचारूं लागल्या. मला बोलवेना, माझ्या हातांतील निमूचा हात पाहून त्या म्हणाल्या,

‘ नखं काळीं कशानं ? विष कीं काय ? ’

त्या गडबडीनें सर्वच आंत आलीं. सर्व प्रकार ध्यानीं येतांच मामा त्वेषानें ओरडले, ‘ थांबा, पोलिसांत वर्दी देतों. माझ्या पोरीला– ’

तो बेडरपणानें म्हणाला,

‘ मला ताप देऊन तुमचा कांहींच फायदा नाहीं. प्रेताची चिरफाड मात्र होईल. ’

‘ आपण स्वस्थ राहिलों त्याचं देखील हेंच कारण ’——असें ती शेजारीण माझ्या कानांत पुटपुटली.

शेवटीं जिवंतपणींच नवऱ्याकडून जें काय तिचें हृदय विदीर्ण झालें असेल तेवढें पुरे ! मृत्यूनंतर आमच्यासाठीं तिचें शव तरी छिन्नभिन्न व्हायला नको असें आम्हीं ठरविलें.

* * * *

ताईची गोष्ट संपतांच मालूच्या तोंडून एकदम उद्गार निघाला, ‘बेरड मेला.’ अश्रुपूरित दृष्टि तिजकडे वळवून त्या म्हणाल्या,

‘ अन् तो कोण असेल असं तुम्हाला वाटतं ? ’

आम्हीं प्रश्नार्थक मुद्रेनें त्यांच्याकडे पहातच राहिलों. त्या म्हणाल्या–

‘ मालूला पाह्यला आला होता तोच तो !’ ’

एखादा विषारी सर्प सर्कन् पायाजवळून सरकून गेला असतां मनुष्य जसा दचकतो त्याप्रमाणें आम्हीं दचकलों.

---

## याचना : : ९

“ ती बघ बनी आली. बनेऽऽ ये. बाबूला घे. येग बने, बाबूला घेऊन भुर्र्र जा खेळायला. ”

आपल्या कडेवरील तें रडवें कृश मूल खालीं ठेवण्याचा प्रयत्न ती तरुणी-तरुणी कसली, अकालीं वृद्धत्व ओढवलेली ती निस्तेज अशक्त स्त्री–म्हणाली. पण आईला सोडण्याची त्या मुलाची इच्छा नव्हती. तिला अधिकच बिलगून तो तसाच रडत होता. त्याला पुनः घेऊन पलंगावर ठेवून थोपटल्यासारखें करीत करीत ती म्हणाली,

“ मग जरा नीज तरी बाबा. कां उगाच छळतोस असा ! मला चुलीकडं नको का बघायला ? सकाळीं नीट जेवण झालेलं नाहीं, अन् आतां यायची वेळ झाली तरी अजून—”

तोंडानें बोलत असतां ती मुलाला थोपटीत होती. तोहि स्वस्थ पडून होता त्यामुळें त्याचा डोळा लागतोसें वाटून तिनें त्याच्याकडे हळूच वांकून पाहिलें आणि तो जागाच आहे असें पाहून ती म्हणाली,

“ छे बाई, अगदीं टकटकीत डोळे ! हा कुठला झोंपायला ? ”

त्याला तेथेंच ठेवून ती आंत गेली आणि दोन खारका आणून त्याच्या हातांत देत म्हणाली,

" घे. बस जरा आतां. तोंवर मी केर काढतें हं. "

हातांत केरसुणी घेऊन ती केर काढूं लागली. केर तो काय ? अवघ्या चार खण खोलीचा काढायचा, त्याला पांच मिनिटेंसुद्धां लागलीं नसती; पण तितका वेळसुद्धां तो स्वस्थ राहिला नाहीं. चघळलेल्या खारका केरांत फेंकून देऊन चिकट हातानें आईचे ओंचे धरून रडत रडत त्यानें केरांतच लोळण घेतली. आपल्या लुगडयाची व त्याच्या सदऱ्याची ती दुर्दशा पाहून तिला अस्सा राग आला होता. पण आधींच त्याचें रडें सतमांत सुरू होतें. त्याला शिक्षा करून त्यांत वाढ करणें म्हणजे स्वतःवरच अनवस्थाप्रसंग ओढवून घेण्यासारखें आहे हें ओळखून तिनें आपला राग आवरला. त्याला उचलून घेऊन बसल्या बसल्याच ती केर काढूं लागली. इतक्यांत शेजारच्या मुलीबरोबर आजच हौसेनें शाळेंत गेलेली तिची छोटी मुलगी बनी दुडुदुडु धांवत आलेली पहातांच चपापून ती म्हणाली,

" अग बाई, वाजले ना साडेचार ? किती उशीर झाला हा ! "

कपाळावर आलेले केंस मागें सारीत व घामानें डंवरलेलें तोंड पुशीत शाळेंतील नवलाई सांगण्यासाटीं विस्तृत डोळे करून मोठ्या उत्सुकतेनें बनीनें " आईग, किनी– " म्हणून सुरवात केली. पण तिकडे दुर्लक्ष करून ती धांदलीनें म्हणाली,

" ये बाई बने, बाबूला घे. आत्तां येणं होईल अन् हा तर जरा रहात नाहीं. आतांशा काय होतं काय जणं, कामच होत नाहीं माझ्यानं. घे बाई, कामाला लागूं दे मला. "

ती आणखी बोलतच होती. पण बनी–ती एवढीशी पोर पण एखाद्या संयमी माणसाप्रमाणें स्वतःच्या तोंडांतले शब्द आणि उत्सुकता मागें परतवून पोक्तपणानें पुढें झाली व रडणाऱ्या भावाला उचलून घेऊन ' हातरे काऊ, हातग चिऊ ' करीत खेळवीत निघून गेली. कुणा त्रयस्थानें पाहिलें असतें

तर तो आश्चर्यानें थक्कच झाला असता. जिची दुसऱ्यानें काळजी घेतली पाहिजे इतक्या लहान वयाची ती मुलगी, तिनें आपल्यापेक्षां मोठ्या भावाला उचलून घ्यायचें, त्याच्या दंगामस्तीला तोंड द्यायचें आणि वर त्याला खेळवून हंसवायचें. मोठें दिव्यच होतें तें! पण ती पोर तें सारें करीत होती. आणि याचेंच कुणाला झालें तरी आश्चर्य वाटलें असतें. पण रमाबाई! तिला तें इतकें संवयीचें झालें होतें कीं–पण जाऊं द्या. कसें झालें तरी ती आई होती, तिला आपल्या मुलीचें आश्चर्य–कौतुक वाटत नव्हतें असें कसें म्हणतां येईल? पण ती स्वतःच इतकी अंतर्बाह्य बदलून गेली होती, वैतागून गेली होती, उत्साहशून्य झाली होती कीं त्याचेंसुद्धां तिला आश्चर्य वाटेनासें झालें होतें. तिचे वडील जर आज हयात असते व त्यांनीं तिला पाहिली असती तर ती आपली एकुलती एक लाडकी लेक मालती, हें त्यांना ओळखतांसुद्धां आलें नसतें. इतका तिच्या स्वरूपांत बदल झाला होता. तिच्या गौर वर्णावर श्यामल छाया पसरली होती. तिचे गाल बसून गेले होते, डोळ्याभोंवतीं कृष्ण वलयें पसरून त्यांतील चापल्य व तेज नाहींसें झालें होतें. हातांचा गोंडसपणा व मृदुत्व लोपून त्या जागीं निळ्या शिरा व खरबरीतपणा हीं आलीं होतीं. गिनीच्या कोंदणांत बसविलेल्या माणकाच्या खड्यासारखीं दिसणारीं तिचीं तांबुस, चमकदार व प्रमाणबद्ध नखें आतां पांढुरकीं व कळाहीन दिसत होतीं. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पहिली पंचविशी ओलांडीत असतांच तिच्यावर जरेची छाया पडूं लागली होती. आणि या साऱ्यामुळें ती स्वतःच आश्चर्याचा विषय झालेली होती. असें कां व्हावें?

योग्य वेळीं अगदीं बाळपणींहि नाहीं आणि घोडनवरी होऊनहि नाहीं अशा सोळाव्या वर्षी ती विवाहबद्ध झाली होती. मधुकरासारख्या तरुण, सुस्वरूप व सुशिक्षित वराशीं तिचें जीवित संलग्न झाल्याबद्दल तिच्या मैत्रिणींनीं मनांतून तिचा हेवा करीत वरून धन्यवाद दिले होते! कितीजणांनीं तरी तिच्या सुभाग्याबद्दल तिचें अभिनंदन केलें होतें. विवाहानंतर देखील दृष्ट

लागण्यासारखें तें जोडपें नांदत होतें. या गोष्टीला फार दिवस झाले नव्हते. नऊ दहा वर्षांपूर्वींची ही गोष्ट !

तिला दोनच मुलें होतीं, पण हें तिचें आठवें गरोदरपण होतें ! आठवी खेप कठीण असते म्हणतात. रमाबाईला तरी हें शेजारणींकडूनच कळलें होतें. आपल्या विधानाची सत्यता पटविण्यासाठीं त्या तिला अनेक दाखले देत. त्यामुळें ' या दिव्यांतून धडपणें आपण कशी पार पडूं याविषयीं प्रथमपासूनच तिचें मन साशंक झालेलें होतें.

तिचें पहिलें बाळंतपण माहेरीं झालें तें लग्नाचेंहि पहिलेंच वर्ष असल्यामुळें साहजिकच पत्नीच्या आहारव्यवस्थेबद्दल मधुकरांनीं मोठ्या आस्थेनें चौकशी केली होती. आणि पतीला व्यर्थ चिंता लागून राहूं नये म्हणून तिनेंहि सर्व सविस्तर लिहून कळविलें होतें. पण त्या व्यवस्थेंत पुष्कळच कमतरता असल्याचें त्यांना वाटल्यामुळें आपल्या माणसाचे असे हाल न करण्याविषयीं त्यांनीं तिच्या माहेरीं निक्षून लिहिलें. तिचे वडील चार महिन्याखालीं वारले होते. आई व भाऊभावजय होतीं आणि जनरीतीस्तव त्यांनीं तिला आणली होती असें म्हणण्यापेक्षा आईच्या आग्रहामुळें केवळ तिला बरें वाटावें म्हणून भावानें तिला आणली होती. अशा परिस्थितींत मधुकराच्या वरील सूचनेमुळें तिच्या भावजयीला फार अपमान वाटला. त्यांचा व ह्यांचा चांगलाच खटका उडाला. त्याचा परिणाम म्हणजे रमाबाईला माहेर अंतरल्यासारखें झालें.

त्यानंतर रमाबाईच्या दोन तीन खेपा झाल्या. परंतु अननुभवीपणाचे परिणाम प्रकृतीवर झाल्याशिवाय राहिले नाहींत. कारण कोणातरी लांबच्या नात्याच्या बाईला मोठेपणा देऊन आणावें लागे व त्या बाईचीच मर्जी व मानमरातब सांभाळण्यापुढें बाळंतिणीच्या व्यवस्थेच्या प्रश्नाला गौणत्व येई. घरांत मायेचें तिसरें कोणीच नसल्यानें नवीन जन्मलेलें पारडें तान्हें व जेमतेम वर्ष गांठलेलें अशा दोन्हीं बालकांकडे तिलाच लक्ष द्यावें लागे. कारण कालपर्यंत अंगावर असलेलें मूल एकदम अनोळखी माणसाकडे राहूं शकत नसे. निराळें मनुष्य ठेवण्याचें झेंपण्यासारखें नसे. वडिलांना सवड नसे.

आणि घरांत व्यवस्था पाह्यला आणलेल्या बाईनें पाहायचें तरी काय काय? शेवटीं बाजेवर स्वस्थ पडलेल्या आईकडेच तें काम साहजिकपणें जात असे.

एकदम दूध तुटल्यानें व आपल्यापेक्षां दुसऱ्याला आई अधिक जवळ करते या जाणिवेनें त्याच्यावर परिणाम होऊन योग्य जोपासनेच्या अभावीं तें मूल इहलोकाचा निरोप घेत असे. आणि त्याच्या दुःखाचा परिणाम त्या नवीन अर्भकाला भोंवून तेंहि आपलें अल्पकालीन वास्तव्य संपवीत असे. त्या दारुण दुःखानें ती दुर्दैवी माता शोकाकुल होई. तेव्हां शेजारणी व परिचित स्त्रिया तिचें सांत्वन करतांना म्हणत, " शोक आवर बाई .. तुम्हां दोघांना हयाती असली तर देवाच्या दयेनं दुसरें बाळ होईल अन् याच्या दुःखाचा विसर पाडील. "

त्यांचा शुभाशीर्वाद फळास येत असे खरा, परंतु दुःखाचा विसर पाडण्याऐवजीं तें द्विगुणित करण्यास कारणीभूत मात्र होत असे. अशा रीतीनें त्या दुर्दैवी आईच्या २।३ खेपा निष्फळ झाल्या होत्या. शेवटीं अशक्तपणामुळें व घरच्या अडचणीमुळेंहि तिला सूतिकागृहाचा आश्रय घ्यावा लागला. तिला जेव्हां तेथील डॉक्टरनें दाखल करून घेतली तेव्हां ते म्हणाले,

" काय ! या मुलीला तीन चार मुलें झालीं ? मग यापुढें हिला अशा स्थितींत लोटणें म्हणजे शुद्ध जुलूम आहे. इतक्या लहान वयांत इतकीं मुलें होणें बरें नव्हे, त्यामुळेंच प्रकृतीचा नाश झाला आहे. शिवाय हल्लींच्या काळीं इतक्या मुलांची जोपासना व शिक्षण नीट होणेंहि दुरापास्त— "

काय उत्तर द्यावें हें न सुचल्यामुळें तोंडावर उसनें हास्य आणून मधुकर स्वस्थ राहिला. पण इतक्यांत रुद्धकंठानें रमाबाई म्हणाली,

" माझं एकहि मूल वांचलं नाहीं डॉक्टरसाहेब. "

डॉक्टरांनीं चमकून तिच्याकडे पाहिलें. तिच्या स्वरांत कातरता होती व डोळ्यांत दुःख दाटलेलें होतें. आईचें हृदय डॉक्टर ओळखीत होते. पित्याला संबोधून बोलतांना स्वरांत आणलेलें काठिण्य टाकून मृदु शब्दांत

त्यांनीं आईच्या हृदयाला आश्वासन दिलें. तथापि तिची करुण परिस्थिति त्यांना स्वस्थ राहूं देईना. इंग्रजींतून त्यांनीं मधुकरांचा बराच समाचार घेतला. रमाबाईनें जेव्हां त्याविषयीं चौकशी केली तेव्हां मधुकरांनीं उत्तर दिलें,

" डॉक्टर म्हणतात अशीं लौकर लौकर मुलं होणं चांगलं नाहीं. त्यामुळंच प्रकृति बिघडली अन् मुलंहि गेलीं. दोन मुलांत कमींत कमी तीन वर्षांचं तरी अंतर पाहिजे. "

" खरंच. "

रमाबाईच्या हृदयांतून नीरव ध्वनि उठला. तिला डॉक्टरचें म्हणणें पटलें. पण ' देवाचं देणं ' या वाक्प्रचारानें संबोधिली जाणारी ही गोष्ट आपल्या हातची कितपत आहे याचा मात्र उलगडा झाला नाहीं.

तेथें मूल जन्मलें तो बाबू. त्यानंतर लगेच वर्षानें बनी जन्मली. तेव्हां तर डॉक्टरनें फारच दोष दिला. यापुढें रमाबाईवर प्रसूतीचा प्रसंग आला तर तिच्या जीविताची आशाच कमी असें डॉक्टरनीं निक्षून सांगितलें. त्यामुळें त्यापुढील अशा प्रसंगीं डॉक्टरची मदत घेणें त्यांना संकोचाचें होऊन बसलें !

गोष्टीच्या सुरवातीला मुलगा पांच वर्षांचा व मुलगी चार वर्षांची होती. पण दिसण्यांत माल उलट दिसत होतीं. बाबूच्या वेळीं गर्भावस्थेपासूनच रमाबाईची प्रकृति व मन:स्थिति नीट नसल्यानें त्याचें पोषण व वाढ नीट झाली नव्हती. जन्मत:च अशक्त दुखणाईत त्यामुळें पहिलीं २–२॥ वर्षें तो पथारीवरच होता. त्यानंतर जरा सावरूं लागला. पण पुष्कळ दिवस पडून रहाण्यांत घालवावे लागल्यामुळें रांगण्याखेळण्याचा प्रसंगच आला नव्हता. पडवळासारखे पाय, बसूं लागल्यापासून खाण्याच्या पदार्थांजवळच वास्तव्य व वारंवार हात पसरण्याच्या व चटकन् हातावर कांहीं पडलें नाहीं तर तोंड पसरून मनांत असेल तेवढें सक्तीनें वसूल करण्याच्या संवयीमुळें फूटबॉलसारखें गरगरीत पोट, कबुतराच्या घरट्यासारखी छाती, बारीक व सुरकुतलेल्या मानेवर

नारळासारखें मोठें परंतु निर्लोम डोकें असें बाबूचें एकंदर स्वरूप होतें. पुष्कळ दिवसांनीं लाभलेला मुलगा आणि त्याची अशी परिस्थिति ! त्यामुळें आई-बापांचें सारें लक्ष त्याच्यावरच केंद्रीभूत झाल्यास आश्चर्य कसलें ? आश्चर्य होतें तें, मुलगी त्याच्याहून एक वर्षानें लहान आहे ही गोष्ट विसरली जात होती त्याचेंच ! पण मागाहून येऊन तिनें त्याच्या पोटावर पाय आणला नव्हता का ? त्याचेंच हें फळ असेल. कांहीं असो. विशेष लक्ष न देतांहि ती बरी वाढत होती. आणि स्त्रीजातीला अकालीं येणाऱ्या समंजसपणामुळें ती आपल्या दुर्बल परंतु अतिशय हट्टी भावाला सांभाळण्याच्या बाबतींत वयाच्या मानानें पुष्कळच प्रौढत्व दाखवीत होती. प्रस्तुतचा प्रसंगहि त्यांतलाच होता. तिनें ' हातरे काऊ ' करीत भावाला उचलून घेतलें, अन् 'भुर्र जाऊं' म्हणून त्याला घेऊन खेळायला गेली. रमाबाईनें केर काढला, टेबल झटकलें आणि ती चुलीकडे गेली. पोहे फोडणीला टाकले नाहींत तोंच मधुकरराव आले. त्यांच्याबरोबर त्यांचे एक ऑफिसांतील स्नेही होते.

मधुकररावांना आज ऑफिसांत जरा विशेष दगदग झाली होती. मागील प्रकरणांचा वेळेवर निकाल न लावल्याबद्दल हेडक्लार्कनें आज त्यांचा लेखी जबाब घेतला होता. त्याचा परिणाम म्हणजे त्यांचें मस्तक तापून गेलें होतें, रागाची वाफ कोठून तरी बाहेर पडून मस्तक शांत होण्याची अत्यंत जरूर होती. आणि या कामीं सत्तेच्या माणसासारखी सोईस्कर जागा दुसरी कोणती असणार ? घरांत येतांच त्यांनीं तिचाच अवलंब केला.

" काय आहे का कांहीं चहा बिहा ? सकाळीं धड वेळेवर जेवण मिळायचं नाहीं. संध्याकाळीं तरी—"

रमाबाईनें लगेच चहा आणून टेबलावर ठेवला. तिला तो उचलायला लावून ते म्हणाले,

" शी. शी. काय ही धूळ. आठ दिवसांत टेबल साफ केलेलं दिसत नाहीं. दर रविवारीं स्वतः करावं तेव्हां. "

हातांत डस्टर घेऊन ते टेबल झटकूं लागले. रमाबाईनें नुकतेंच तें झट-

कलें होतें. पण रहदारीच्या रस्त्यावरील घर. त्यामुळें एक मोटार गेली कीं टेबलावर धुळीचा हा थर सांचत असे. तसें बोलण्याचें रमाबाईच्या अगदीं ओंठावर आलें होतें, पण तिऱ्हाइतादेखत तिष्ठत रहाण्याची शिक्षा झाली तेवढीच पुरे, बोलून अधिक बोलून घेणें नको अशा विचारानें ती स्वस्थ राहिली. तिची स्थिति लक्षांत घेऊन मित्र म्हणाला,

" राहूं द्या हो. रस्त्यावरचं घर तेव्हां रहदारीनें धुरळा घरांत येणारच."

" कबूल आहे. येणारच. पण दिवसाकाठीं एकदां तरी तो झटकायला नको का ? इथें तर आम्हीं झटकल्याशिवाय तो झटकलाच जाणार नाहीं. रोजचंच आहे हें ! "

पतिपत्नींनीं एकत्र चहापान केलेल्या आठवणी आतां ती विसरूं लागली होती. सुट्टीच्या दिवशीं कधीं कधीं एकदम जेवायला बसण्याचा प्रसंग येई पण त्यावेळीं स्वतःच्या पानांतील आवडता पदार्थ पत्नीच्या पानांत टाकून आग्रहानें तो तिला खायाला लावण्याइतके ते पूर्वीसारखे बालिश राहिले नव्हते. आतां ते ताटांतील पदार्थ ताटांतच पिस्करून विचारीत,

" काय केलंय हें ? त्यापेक्षां अमूक केलं असतं तर ? आतां जेवायचं तरी कसं ? "

बिचारी रमाबाई ! तिला हें नेहमींचेंच होतें. पण सरावानें तिचें मन निर्ढावण्याऐवजीं अधिक हळुवार मात्र झालें होतें. प्रत्येक धडाक्यानें तें कंपित होई व अश्रु झिरपत.

आतांहि डोळ्यांत दाटलेलें दुःख कोणाला दिसूं नये म्हणून ती झटकन् आंत गेली व खरबरीत हातानें डोळे पुसून कामाला लागली.

चहा घेतां घेतां मित्र म्हणाला,

" काय हो, तुमच्या पत्नीची प्रकृति नीट दिसत नाहीं. "

" अहो, तेंच चाललं आहे, आज दहा वर्षे तेंच निस्तरतों आहें. "

" म्हणजे असं काय होत आहे त्यांना ? "

" नशीब, दुसरं काय ! हंसूं नका असे, थट्टा नव्हे, खरंच सांगतों,

दर वर्षाच्या बाळंतपणाच्या खर्चानें अन् त्रासानें कंटाळलों अगदीं. अहो दर वर्षी शेंसवाशें रुपये आणायचे कुठून ? ”

“ तुम्हीं खर्चाची काळजी करतां तितकी पत्नीच्या प्रकृतीची केली असती तर बरं झालं असतं ! ”

“ मी काय करावं म्हणतां ? वेळीं पानावर पडेल तें व तसं खाऊन धांवतों आहें, तेव्हां खर्चाची जेमतेम तोंडमिळवणी होते. घरीं असं अन् तिकडे ऑफिसांत काय सुख असतं तें तर तुम्हांला ठाऊकच आहे ? ”

“ त्यांचं कोणी माहेरचं नाहीं का ? ”

“ आहे म्हटलं तर आहे, नाहीं तर नाहीं ! ”

पूर्वी आनंदी व उत्साही असलेला गृहस्थ आतां कसा निराश व बेपर्वा बनला आहे याबद्दल आश्चर्य करीत सहानुभूतीच्या स्वरानें तो मित्र म्हणाला,

“ अहो, अशीं उडवाउडवीचीं उत्तरं काय देतां ? जरा सीरिअसली घ्याना ! त्यांच्या माहेरीं कोणी असलं तर तिकडे त्यांना धाडा. तुमचा पैसा अन् त्यांची सेवा शुश्रूषा यांनीं त्यांना खचित आराम वाटेल. असे हताश काय होतां ? ”

“ अहो पण ती गेली पाहिजे ना ? तिला मुळीं जायला नको. ”

“ कारण ? बहुधा तुमची गैरसोय होऊं नये हेंच असेल ? ”

“ छे छे. माझी कसली गैरसोय ? कुठल्याहि क्षुधाशांतिगृहांत माझी सोय होऊं शकेल. न जाण्याला निराळंच कारण आहे. ”

“ असेल, पण तुम्हीं समजूत घाला; नीट काळजी घ्या. अशी डोळेझांक करून कसं चालेल ? ”

“ डोळे झांकेपर्यंत आमचं असंच चालायचं. जाऊं द्या झालं. निघालांत ? बरं, या. नमस्कार ! ”

चार खणांच्या दिवाणखान्यांतून दोन खणांच्या स्वयंपाक घरांत वरील संवाद ऐकूं यायला कठीण गेलें नाहीं. रमाबाई सारें ऐकत होती. खरें म्हणजे तिची आई असतांना ती माहेरीं जाऊं इच्छित असे. तेव्हां अभिमानाच्या

भरीं पडून मधुकरराव तिला पाठवूं इच्छित नसत. आतां परिस्थितीनें शहाण-पण प्राप्त झाल्यावर त्यांचें मतपरिवर्तन झालें होतें, पण भाऊभावजयींच्या उपयोगीं पडून त्यांचें मनोमालिन्य घालविण्याची संधि आपल्याला कधींच लाभली नसतां आईच्या पश्चात् आपला भार त्यांच्यावर टाकायला तिचें मन धजावत नव्हतें. परंतु आपल्या सतत सान्निध्यानें व परिस्थितीनें कावून गेलेल्या पतीची मनःस्थिति ऐकून तिनें भावाकडे जाण्यासाठीं मन तयार केलें. आपल्या जाण्यानें त्यांस थोडीतरी उसंत मिळेल ही गोष्ट आपल्या-पेक्षां पतीच्या प्रकृतीच्या दृष्टीनें खचित महत्त्वाची आहे असा तिनें विचार केला.

" मी येत आहें " असें लिहून, " तूर्त आमची अडचण आहे " असें प्रत्युत्तर येण्याला सवड ठेवण्यापेक्षां एकदमच जाण्याचें तिनें ठरविलें. तिच्या या समंजसपणाच्या बेतानें मधुकररावांना बरें वाटलें.

कांहीं असलें तरी पाठची बहीण—जिच्या डोक्यावर सौभाग्यछत्र आहे अशी—कांहीं दिवसांकरितां घरीं चालून आली तर कोणता भाऊ तिला आपला दरवाजा बंद करील ? रमाबाईची व्यवस्था माहेरीं ठीक लागली. योग्यवेळीं तिची सुटका झाली. पण ती खूप आजारी पडली. गांवच्या वैद्यानें प्रकृति पाहून रोग निदान केलें कीं,

" हा बाळंतपणाचा ताप असाच राहिला तर राजयक्ष्मा होईल. "

क्षयरोगाची जशी काळजी घ्यायला पाहिजे, तशीच तिची भावजय घेत होती. तिला तिची काळजी नव्हती का ?

बाबूची ब्याद पूर्वीप्रमाणेंच बनीवर लादलेली होती आणि बनीचा हवाला तिनें देवावर टाकलेला होता. छोट्या मुलाचाच काय तो प्रश्न होता. कारण दिवसेंदिवस ती झिजत चालल्यामुळें त्याचें पोषण होत नव्हतें. तरी ती रेंटीत होती. आपल्या दगदगींतून थोडीतरी उसंत पतीला देतां आली आहे या जाणिवेनें व पतीकडून बिनचूक येणाऱ्या पैशामुळें आपण केवळ भावावर भार

टाकून नाहीं या गोष्टीमुळें तिला एकप्रकारें फार समाधान वाटत होतें. परंतु भाऊभावजयीचें स्वास्थ्य मात्र पार नष्ट झालें होतें.

" मालूची आशा नाहीं. " असें पत्र त्यांनीं मधुकरांना पाठविलें होतें व ते त्याची वाटच पहात होते.

रमाबाईचा डोळा लागला होता. तिच्या फिक्कट मुद्रेवर क्षीण हास्यरेषा उमटत होत्या. बाहेर उमटूं पहाणारा विशाल आनंद लज्जेमुळें आंतल्या-आंत दाबल्यानें ध्वनि न उमटतां, एखाद्या नववधूच्या मुखावर नुसत्या त्याच्या छटाच उमटतात, तशा तिच्या ओंठांतून क्षीण हास्यरेषा उमटून त्यांच्या छटा बसलेल्या फिक्कट गालांवरून कानांपर्यंत पसरत होत्या. ती एक सुखस्वप्न पहात होती. डोळा लागण्यापूर्वी नुकतीच तिनें हताशपणें आपल्या कृश देहयष्टीवरून दृष्टि फिरविली होती. आणि आपल्या पूर्वीच्या स्वरूपाशीं तिची तुलना करून ती मनस्वी कष्टी झाली होती. परंतु आतां तें दृश्य पार बदललें होतें.

आपण आपल्या कृश कलाहीन जीर्ण देहाचा त्याग केला असून आपल्याला पूर्वींपेक्षांहि सुंदर कांतिमान् शरीर प्राप्त झालें आहे. पूर्वीच्या त्या जीर्ण शरीराच्या पायघडीवरून हर्षनिर्भर चालत आपण पुढें येत आहोंत तोंच आपले पति बाहू विस्तारून आपल्या स्वागताला समोर उभे ! त्याच क्षणीं त्यांच्या करपाशांत बद्ध झाल्यामुळें लाजून आपण अधोवदन झालों आहोंत !

स्वप्नांतील या सुखद दृश्यावलोकनानें निद्रेंत तिच्या मुखावर हास्यरेषा उमटल्या होत्या. परंतु एकाएकीं तें दृश्य पालटलें. आपली लज्जावनत दृष्टि किंचित् किलकिली करून तिनें वर पाहिलें तों आपल्याऐवजीं दुसरीच कोणी सुस्वरूप तरुणी पतीच्या बाहूंत आहे, आणि त्याच जीर्ण देहानें आपण जमिनीशीं खिळलेली आहों.

तिला तें दृश्य पहाणें असह्य झालें. एक करुण किंकाळी फोडून तिनें एकदम डोळे उघडले तों खरोखरच मधुकरराव समोर उभे होते !

" स्वप्नांतील एका भागाचें प्रत्यंतर तर आलें. पुढचेहि भाग असेच प्रत्ययास येणार काय ? "

तिचें अंग थरारलें. ती अस्फुट स्वरांत उद्गारली, " अरेरे. "

मधुकरराव पुढें झाले. पत्नीचा हात हातीं घेऊन व दुसऱ्या हातानें तिच्या कपाळावरील घाम पुशीत ते म्हणाले,

" काय ? काय झालं ? स्वप्न पडलं का ? घाबरलीस ? "

तिनें मानेनेंच होकार दर्शविला. अजून तिचे ओंठ थरथरत होते. छाती जोरानें उडत होती आणि डोळ्यांत भीति दाटली होती. तिचें मस्तक कुरवाळून ममतेच्या स्वरांत ते म्हणाले,

" घाबरूं नको. मी जवळ आहें. आतां कसं वाटतं ? पाणी देऊं का ? "

त्यांनीं पाजलेला पाण्याचा घोट पिऊन जरा घसा मोकळा झाल्यावर ती म्हणाली,

" आलांत बरं झालं; एक मागणं आहे. शेवटचं मागणं— "

अनुनयाच्या स्वरानें ते म्हणाले, " असं काय बरं ? आतां बरं व्हायचं कीं अशी निरवानिरवीची भाषा बोलायची ? "

" अंहं ! आतां कसली बरी होणार मी ? तें असो. माझं इकडं एक मागणं आहे. "

" काय ? "

" आपण दुसरं लग्न करावं— "

हंसत हंसत मृदुस्वरानें ते म्हणाले,

" वेडी रे वेडी. "

" खरंच सांगतें. माझं आतां काय ? तेव्हां आपण— "

तिला मध्येंच थांबवून ते म्हणाले,

" छट्, असं भलतं सलतं बोलूं नये. तूं लौकरच बरी होशील. अन् हीच का माझी परीक्षा केलीस ? मला मुलांची काळजी नाहीं असेंच ना ? "

तिचे ओंठ थरथरले. गर्दीनें जिभेवर येणारे शब्दसमूह जणू काय ओठानें ती अडवीत होती. कांपऱ्या आवाजानें ती म्हणाली,

" त्यांची नको चिंता. तें सारं बनीवर सोपवलं आहे, अन् सारं तरी काय ? "

त्या बाजेवरल्या बारीक मुलाकडे बोट करून ती पुढें म्हणाली, " त्या लेंकराला त्याचं जीवमान असेतों लाजेकाजेनं कुणीतरी पाहील, नाहीं तर त्याचं नशीब ! बनी आहे पोरीची जात. तिच्यावरच बाबूचा भार टाकला आहे. "

शेवटचीं वाक्यें तिनें अगदीं हताशपणें उच्चारलीं. तिच्या त्या कांपऱ्या आवाजानें त्यांचें हृदय कंपित झालें. मुलांची निरवानिरव तिनें परस्पर संपविली, ही बाबत आपल्यावर विसंबण्याइतका आपला विश्वास तिला वाटला नाहीं हें जाणून त्यांचें मन अगदीं व्याकुळ झालें. कोणत्या शब्दांनीं आपल्या प्रेमाची व कर्तव्याच्या जाणिवेची खात्री पत्नीला पटवून द्यावी हें त्यांना सुचेना. मूढ होऊन निश्चल दृष्टीनें ते तिच्याकडे पहातच राहिले. एक एक शब्द सावकाश उच्चारीत ती म्हणाली,

" मी आतां जात आहें. बोललें त्याची क्षमा करावी. खुशाल दुसरं लग्न करावं. पण एकच सांगणं. "

तिची कोणतीहि गोष्ट आज्ञेप्रमाणें बिनशर्त मान्य करण्याच्या तत्परतेनें तिचे थंड हात आपल्या हातांत घेऊन हळुवारपणें कुरवाळीत, जणूं काय तिच्या तोंडातून शब्द निघतांच तत्क्षणीं " हें घे वचन " असें म्हणतां यावें अशा तयारीनें ते म्हणाले,

" काय ! "

दिव्यांतील तेल संपलें होतें. ज्योतीची शेवटची फडफड चालली होती. सर्व शक्ति एकवटून अगदीं जीवाच्या ओढीनें तिनें उत्तर केलें,

" संततिनियमन— "

---

## वादळी पातळ : : १०

‘ आणलं ? ’

तो हंसला. तीहि हंसूं लागली. हंसतहंसतच तो म्हणाला,

‘ ओळख पाहूं ? ’

‘ नाहींच तें ! ’

बोलतांना मान वेळून तिनें जो लाडिकपणाचा रुसका आविर्भाव केला, तो पाहून त्याला गंमत वाटली. मनमोकळें हंसत तो म्हणाला,

‘ हं, हें पहा. ’

त्यानें कागदांत गुंडाळलेलं एक लहानसं पुडकं तिच्यापुढें टाकलं, पण ती स्वस्थच राहिली; तेव्हां तोच तें उलगडूं लागला आणि म्हणाला,

‘ कांठाचं डिझाइन पहाशील तर थक्कच होशील. रंग अन् पोत तर पहा.’

तलम पोत, बादली रंग आणि तांबडेलाल बांधणीचे कांठपदर ! दिसण्यांत फार छान होतें तें. तिनें एक बाजू हातांत घेऊन पोत पाहिलें, जवळ दूर

धरून रंग पाहिला आणि सबंध घडी हातावर तोलून वजन पाहिलें. तिची ती परीक्षा करण्याची पद्धत पाहून त्याला मौज वाटली. त्यानें हंसतहंसत प्रश्न केला,

' काय ? पास कीं नापास ? '

त्याच्या प्रश्नाचें उत्तर टाळून तिनें प्रश्न केला,

' कुणाकरितां हें ? '

' कोणाकरितां ? कोणाकरितां कां असेना ? चांगलं आहे ना ? '

' हो, फारच छान आहे; पण कुणासाठीं–'

तो हंसून म्हणाला,

' ओळख पाहूं ! '

' कुणा गुजराथी मित्राकरितां असेल ! '

मोठमोठ्यानें हंसत तो म्हणाला,

' छट्. गुजराथी मित्राकरितां नाहीं, महाराष्ट्रीय मैत्रिणीकरितां ! जिवलग मैत्रिणीकरितां ! '

त्यानें तिच्या कानाजवळ तोंड आणून शेवटच्या वाक्यावर जोर दिला आणि तो मोठमोठयानें हंसूं लागला. ती म्हणाली,

' असं ! '

आणि एखादी भयप्रद वस्तु झट्कन् टाकून द्यावी त्याप्रमाणें तिनें ती पातळाची घडी खालीं टाकली. ती उचलून घेत तो म्हणाला,

' हें काय, अशानें मळेल ना ? अन् माझी मैत्रीण रागावेल ना ? '

कपाळाला बारीकशी आंठी चढवीत ती म्हणाली,

' कोण ती ? '

तिचा हात हातीं घेत हंसत हंसत तो म्हणाला,

' ही पहा ती ! वेडी रे वेडी ! कशी एका माणसाची मौज झाली ! एवढंसुद्धां ओळखतां येऊं नये ना ? अन् राग मात्र नाकावर ! तूं पातळ आणायला सांगितलं होतंस ना ? मग असा कांगावखोरपणाचा प्रश्न कां विचारलास ? हें सुंदर पातळ मीं तुझ्याकरितां आणलं आहे–'

' माझ्यासाठीं ? हें पातळ माझ्यासाठीं ? शक्यच नाहीं ! '

तिच्या स्वरांत व आविर्भावांत अविश्वास पूर्णपणें प्रतिबिंबित झालेला दिसत होता. त्याकडे आश्चर्यानें पहात तो म्हणाला,

' कां ? कां शक्य नाहीं ? '

' कारण अशा तऱ्हेचीं पातळं आपल्या इथं कुणीच नेसत नाहीं, अन् शिवाय पांचवारी पातळं मी नेसत नाहीं ! '

तिच्याकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पहात तो म्हणाला,

' पण कां नेसत नाहीं ? '

' इश्श ! गोल नेसतांना पाहिलंय का कधीं मला ? '

' म्हणजे ? '

' म्हणजे बिनकासेचं ? '

' पण मीं कधीं सांगितलं तसं नेसायला ? '

खो खो हंसत ती म्हणाली,

' सांगितलं नाहीं, पण आणलं तर खरं ! '

' म्हणजे हें लहान आहे ? '

' नाहीं तर काय ? हें अस्सं नेसायला पुरणार आहे का ? '

' तें आम्हांला काय माहीत ! ' आणीत नाहीं ' ' आणीत नाहीं ' ही तक्रार घालविण्यासाठीं कधीं नव्हे तें आणायला गेलों. आम्हांला ह्या बारकाया काय माहीत ? रंग, पोत, विशेषतः कांठपदराचं डिझाइन फार आवडलं म्हणून हें घेतलं. पण पुरुषांनीं आपल्या आवडीनं आणलेलं बायकांना कधीं आवडलं आहे ? '

' न आवडायला काय झालं ? छानच आहे कीं हें ! ह्या फिक्कट वादळी रंगाला तांबडे बांधणीचे कांठ कसे खुलून दिसतात ! फारच आवडलं मला हें पातळ. पण प्रश्न असा आहे कीं, हीं गुजराथी तऱ्हेचीं पातळं गोलच नेसलीं पाहिजेत अन् मी तर पहिल्यापासून अस्सं नेसत आलें, तेव्हां आतां नव्यानं गोल नेसायची मनाची तयारी होत नाहीं. '

‘ कां ? ’

‘ लोक हंसतील म्हणून. ’

‘ पण कां हंसतील ? हंसण्यासारखं यांत असं लोकविलक्षण काय आहे ?’

‘ नसलं म्हणून लोकांना काय ? त्यांना हंसायला अगदीं थोडं कारण पुरतं ! म्हणतील ‘ आतां नटवेपणा करायला लागली ! ’ दुसरं काय ! ’

‘ मग घरांत नेसावं. ’

‘ घरांत ? असं सुंदर पातळ घरांत नेसून मळवायचं ? छे. शिवाय घरांत नेसायला देखील तीच अडचण आहे ! ’

‘ अडचणीपेक्षां नियमाचं महत्त्व विशेष असेल ! घरांत मळकट वाईटसं नेसण्याचा बायकांचा नियम ! ते माझे मित्र जोशी म्हणतात तें खोटं नाहीं— तुम्हीं बायका म्हणजे अशाच ! ’

ती हंसत हंसत म्हणाली,

‘ अन् पुरुष ! ’

‘ पुरुष नाविन्याचा चाहाता अन् वैचित्र्याचा भोक्ता असतो ! ’

‘ स्त्रिया कांहीं नाविन्याच्या द्वेष्ट्या नसतात बरं. ’

‘ मग हें पातळ का फुकट— ’

‘ फुकट कशानं जातंय, त्याचं करूं कांहींतरी. पण हें दुसरं पुडकं कसलं ?’

पुडकें घेतलेला हात मागें करून तो गंभीरपणानें म्हणाला,

‘ ती एक अनपेक्षित राजेशाही खरेदी आहे, पण राणीसाहेबांना आवडेल तेव्हां खरी ! ’

‘ पण काय ती ? पाहूं तरी ? ’

पुडकें सोडून त्यानें एक सुंदर पिरोजी रंगाचा जरीबुट्टीचा झिरझिरीत शेला उलगडून तिच्या अंगावर टाकला ! तो काढून घेत ती म्हणाली, ‘ काय पडलं याला ? ’

‘ कांहीं का पडेना ! सुंदर आहे कीं नाहीं सांग आधीं ? ’

‘ फारच सुंदर आहे, पण काय दिलं याला ? ’

'काय [ ]लं ते सांगितलं तर वस्तूची किंमत कमी होईल, म्हणून आधीं थोडा इतिहास सांगतों. ही वस्तु राजदरबारी आहे ! त्या......च्या संस्थानिकांच्या दोन मुलांचीं लग्नं झालीं. त्या वेळीं आलेल्या आहेरांचा लिलांव होता आज. मीं सहज जातांना गर्दी पाहिली तेव्हां गेलों, तों लोक भराभर घेत होते. आमच्या देशपांड्यांनीं एक शाल घेतली. कोणी शालू, कोणी शेले, कोणी खण, जरीचीं लुगडीं असं घेत होते लोक. मीहि हा शेला घेतला. पन्नास पाऊणशेंचा सहज असेल. थोडक्यांत मिळाला म्हणून घेतला.'

'तरीच. मग बरोबर ! मोठ्या लोकांनीं मोटारींतून मिरवतांना अंगावर घेण्यासारखा आहे खरा. पण आमच्यासारख्यांनीं रस्त्यानं जातांना वापरण्यासारखा मात्र खास नाहीं.'

'म्हणजे हाहि फुकटच !'

ती हंसत हंसत म्हणाली,

'नाहीं तर काय ? अशीं राजेशाही वस्त्रं स्वस्त मिळालीं तरी वापरणाराची योग्यायोग्यता नको का पाह्यला ? नाहीं तर फुकट हंसूं व्हायचं.'

हास्याचें प्रमाण आणखी वाढवीत ती पुढें म्हणाली,

'हा शॉर्टसाइटचा परिणाम बरं ! मी नेहमीं सांगतें चष्मा वापरायला तें एवढ्यासाठींच ! याचा झिरझिरीतपणा अन् आंखूडपणा तेव्हांच दृष्टीस पडला असता चष्म्यांतून !'

'छट्, इथं दिसण्याबद्दलचा प्रश्न नाहींच मुळीं. प्रश्न व्यवहाराचा आहे. मला वाटलं, फार तलम पोत असल्यामुळं लहान घडी झाली असेल पातळाची. पातळ पांच वारीच असतं कीं दहा वारी हें कोणाला माहीत आहे इथं !'

'ठीक, मग तलम म्हणून एखादी ओढणी किंवा बारीक म्हणून जाळीसुद्धां घेऊन याल एखादी !'

'एवढा कांहीं मी अगदींच हा नाहीं ! वाटलं कीं, राजेरजवाड्यांच्या बायका वापरतात तसले कपडे वापरायला मिळाल्यानं आमच्या राणीसाहेब

खूष होतील. पण बायकांचं शास्त्र कांहीं निराळंच ! लिलवांत घेतलेले कपडे हे. तेव्हां ते आतां परत घेऊन पैसे मिळतील असेंही नाहीं– '

' असूं द्या, त्यांची करूं कांहींतरी व्यवस्था. या पातळाचे ब्लाऊझ कसे छान दिसतील. अन् शेला लग्नकार्यांत वापरतां येईल. पण उद्यां आधीं पातळाची जोडी आणायला हवी ! '

' म्हणजे ! आम्ही हौशीनं आणलेल्या पातळाचे अशा रीतीनं तुकडे तुकडे करणार तर ? पहा आतां कधीं कांहीं आणतों का ? '

ओशाळून हंसत ती म्हणाली,

' बरं तर, नाहीं करणार. '

दुसऱ्या दिवशीं सुट्टी असल्यानें तिची एक कॉलेजांत शिकत असलेली जिव्हाळ्याची मैत्रीण शुभाताई तिला भेटायला आली असतां तिनें पति-राजांची राजशाही वस्तूंची खरेदी तिला दाखविली व त्यांच्या अव्यवहारी-पणाबद्दल दोघी मैत्रिणींनीं पुष्कळ टीकात्मक विनोद केला. त्यानेंहि त्या दिवशीं आपल्या घरोब्याच्या मित्रांजवळ आपल्या पसंतीचा अनादर झाल्याबद्दल तक्रार सांगून सर्वांस हंसविलें. हास्यविनोदाकरितां कांहीं दिवस त्यांना हाच विषय पुरला होता. जेव्हां घरांतल्याघरांत तें पातळ नेसण्याची सुमित्रेवर सक्ति झाली तेव्हांच तिनें मनोहराच्या व्यवहाराच्या अनभिज्ञतेबद्दल विनोदात्मक टीका करायचें थांबविलें ! मनोहर व सुमित्रा हें मोठें आनंदी व विनोदी जोडपें होतें.

* * * *

एके दिवशीं दुपारींच मनोहर घरीं आला आणि पत्नीकडे चमत्कारिक नजरेनें पहात म्हणाला,

' काय ? आज कुठं जायचं नाहीं वाटतं ? '

अलीकडे ती सार्वजनिक कामांत भाग घेऊं लागल्यापासून, तो तिच्या कामाची चौकशी करण्याकरितां नेहमींच याप्रमाणें विचारीत असे, थट्टा करीत असे, सूचना करीत असे व प्रसंगीं मदतहि करीत असे. त्यामुळें आज

आवाजांत तिला चमत्कारिकपणा भासला तरी प्रश्न विलक्षण वाटला नाहीं. त्याच्याकडे स्निग्ध नजरेनें पहात ती म्हणाली,

‘ कां ? ’

‘ नाहीं, म्हटलं कुठं सभा, समाज, सिनेमा कांहीं नाहीं का आज ? ’

ती हंसत हंसत म्हणाली,

‘ नाहीं कसं, आहे तर. ही समाजांतून आत्तांच आलें, आतां संध्याकाळीं ५॥ वाजतां वसंत क्लबच्या गणेशोत्सवाचं कांहीं फंक्शन आहे. मुख्य म्हणजे गाणं अन् नकला. निराळं आमंत्रण असेलच आपल्याला ? तिथं आज सारी बडीबडी मंडळी येणार आहेत तेव्हां चालकांनीं आपल्याला आग्रहानं बोलावलं आहे. आपण आज अगदीं आलं पाहिजे हं ! बरोबरच जाऊं या. ’

कपाळाला एक बारीकशी आंठी चढवून तो म्हणाला,

‘ साडेपांचाला जायचं त्याची आतांपासून तयारी ? ’

‘ नाहीं, आधीं आत्तां मला मंजिरीबाईच्या बंगल्यावर जाऊन यायचं आहे– ’

पिळांच्या चक्करावर आंकडे नीट खोंचतांना त्याच्या प्रश्नार्थक नजरेकडे पहात ती पुढं म्हणाली,

‘ परवांच्या स्त्रियांच्या सभेचं अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति करायला. इतक्यांत मधुकर येतील. त्यांच्याच गाडींतून मंजिरीबाईकडे जाऊन येईन. मग आपण बरोबर जाऊं. ’

‘ हं. ’

मनोहरानें दीर्घ निश्वास टाकला. मधुकरराव गणेशोत्सव मंडळाचे सेक्रेटरी होते. खास स्त्रियांच्या सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याकरितां स्त्रियांच्या वतीनें आमंत्रण देण्यासाठीं स्त्रीनें जाणें जरूर होतें. सुमित्रेनें तें कबूल केलेलें होतें.

मधुकररावांबद्दल मनोहराची फारशी आदराची भावना नव्हती. तथापि ठरलेल्या कार्यक्रमास अडथळा करणें अव्यवहार्य ठरलें असतें. क्विनाईनचें सेवन अवश्य असलें तरी तोंड कडवट होणें अपरिहार्यच असतें. त्याचा ‘ हं ’

हा उद्गार तिनें संमतिदर्शक मानला तरी तो कडवटपणानेंच उच्चारलेला होता.

मधुकररावांची मोटार आली व त्यांच्यासह ती निघून गेल्यावर मनोहराची मनःस्थिति फारच बिघडली. ती गेल्याक्षणापासूनच तो तिची परत येण्याची वाट पाहूं लागला; आणि प्रत्येक क्षणीं तिला जाऊन कितीतरी वेळ झाला असेंच त्याला वाटूं लागलें. आपण तिला ' जाऊं नको ' असें कां सांगितलें नाहीं, असेंहि त्याला वाटलें. ' पण कारण काय सांगितलं असतं ? त्याच्या-बरोबर हिंडणें मला आवडत नाहीं हें ? छट्, तें अगदीं रानटीपणाचं, म्हणजे तिच्यावर माझा विश्वास नाहीं असंच उघड सांगितल्यासारखं झालं असतं. तिच्यावर माझा विश्वास आहे; पण ती भोळी आहे अन् तो अविवाहित आहे. त्याची वृत्ति आणि वर्ण दोन्ही त्याच्या नांवाप्रमाणेंच आहेत ! अशाच्या सहवासांत— सार्वजनिक कामासाठीं कां होइना—तिला कांहीं तरी काळ घालवावा लागतो—

' पण याला कारण कोण ? मीच ना ? वडिलांच्या मृत्यूमुळं दुःखविव्हल होऊन आजारी पडलेल्या सुमित्रेच्या मनाला कांहींतरी विरंगुळा व्हावा, याक-रितां हें ऑनररी वर्क करायला तिला मींच लावलं ना ? अर्थात् असं कार्य करीत असतांना भल्याबुऱ्या— दोन्ही वृत्तींच्या माणसांशीं तिचा संबंध येणारच! तिच्यावर विश्वासून त्याला मी तयार असलं पाहिजे !

' तिच्यावर विश्वास ? तिच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे, आज लग्न होऊन नाहींतरी सातआठ वर्षें झालीं. तिची मला पूर्ण पारख आहे अन् म्हणूनच अस्वस्थ वाटतं. ती सरळ आहे, अन् आपल्यासारखंच जग आहे असं मानण्याइतकी भोळी आहे. पण खरोखर जग तसं नाहीं हें तिला समजायला पाहिजे होतं ! पण तेंच तिला समजत नाहीं ! ती अल्लड असली तरी तिच्यावर माझा विश्वास आहे. पण तो बाबूराव काय म्हणाला बरं ?

अगदीं हंसत हंसत, सहज, अगदीं सहज, तापलेलं तेल जणूं त्यानें माझ्या कानांत ओतलं.

' कॉंग्रॅच्युलेशन्स ! तुझे पैसे फुकट गेले नाहींत कांहीं ! वहिनी ते कपडे वापरूं लागल्या शेवटीं ! काल पहिल्या 'शो'ला मीसुद्धां गेलों होतों. तूं कांहीं दिसला नाहींस, मधुकर होता वैनीबरोबर पुढच्याच रांगेंत ! '

' हेच ते त्याचे विषारी शब्द ! कच्छविहीन म्हणून जें पातळ घरांतल्या घरांत नेसून दाखवितांना जिनें लाजलाजून पुरेपुरे केलें तीच काल तें पातळ नेसून अन् तो झिरझिरीत शेला पांघरून त्या बेरडाबरोबर सिनेमाला गेली ! मी आग्रह करीत असतां लोक हंसतील या सबबीवर माझी आवड धाब्यावर बसवून तें पातळ घरांत नेसून वापरण्याचंसुद्धां तिनें नाकारलें ! अन् त्याच्याबरोबर नेसून हिंडतांना कांहींच वाटलें नाहीं, अं ! छे, लोक तिला हंसले नसतील, मलाच हंसले असतील. उत्तमोत्तम वस्त्रें नवऱ्यानें आणावींत, पण तीं नेसलेलीं पाहण्याचं भाग्य त्याला नसावं, तें दृष्टिसुख अशा लोकांना लाभावं--? हें किती चमत्कारिक ! '

त्यानें जोरानें ओंठ चावला, त्याच क्षणीं मोटारचें हॉर्न वाजलें आणि ती दाराशीं थांबली. त्याला वाटलें ती आली. तो न कळत उत्सुकतेनें उठला. नकळत त्याचे पाय दाराकडे चालूं लागले. त्याची शोधक दृष्टि मोटारीकडे वळली. मोटारींत कोणीच नव्हतें ! ड्रायव्हर हातांत चिठ्ठी घेऊन त्याच्यापुढें अदबीनें उभा राहिला होता. मनोहरानें ती चिठ्ठी त्याच्या हातांतून जवळजवळ हिसकावून घेतली. आणि जरा वळून त्यानें ती उघडली. वाचीत वाचीतच तो आंत टेबलाजवळ गेला. वाचतांना मुद्रेवर होणारे फेरबदल परक्याच्या दृष्टीला दिसूं नयेत असाहि त्याचा उद्देश असेल. तो वाचूं लागला—

' .........बंगल्यावरच जरा अधिक वेळ मोडल्यामुळें मधुकररावांबरोबर मी परस्परच वसंत क्लबकडे जात आहे. माझा चहा वगैरे मांजिरीबाईकडेच झाला. आपण झटकन् चहा घेऊन क्लबांत लौकर यावें. मोटार पाठविली आहे, तिची खोटी करूं नये; कारण तीच गाडी अध्यक्षांना आणण्याकरितां

जावयाची आहे; पण मीं सांगितल्यावरून मधुकररावांनीं आम्हीं आपणाला आणण्यासाठीं पाठविली आहे.

आपली

सुमित्रा. '

' आपली सुमित्रा ? छट्, जगन्मित्रा ! जगन्मित्रा ! '

तो स्वगत पुटपुटला. त्यानें चिठ्ठीचे तुकडे तुकडे केले. कांचेचें पेपरवेट उगाचच उचलून दणकन् टेबलावर आदळलें. त्याचा धक्का लागून टेबलावरचें सुंदर ' फूलपात्र ' फुटून त्याचेहि तुकडे तुकडे झाले. आवाजासरसा ड्रायव्हर आंत डोकावून म्हणाला,

' येतां ना साहेब ? रावसाहेबांनीं जलदी बोलावलं—'

त्यानें तीक्ष्ण स्वरानें उत्तर दिलें,

' नाहीं. '

' बाईसाहेब म्हणाल्या, अन् रावसाहेबसुद्धां म्हणाले, जलदी घेऊन ये साहेबांना ! '

तो मनांत म्हणाला,

' खड्ड्यांत पडला तुझा तो रावसाहेब अन् ती—'

नंतर मोठ्यानें म्हणाला,

' जा तूं लौकर गाडी घेऊन जा. मला काम आहे. येतां येत नाहीं. '

त्याचीं तीं तुटक वाक्यें उच्चारण्याची तऱ्हा पाहून तो आजारी असा असावा ड्रायव्हरनें तर्क केला. त्यालाहि लौकर येण्याची ताकीद असल्यामुळें तो झटकन् गाडी घेऊन गेला.

* * *

मनोहर न आल्यामुळें सुमित्रेला एक प्रकारें चुटपूट लागून राहिली. उत्सवाच्या चालकाच्या आग्रहावरून तिनें संवाद तयार करून बसवून दिला होता. तिनें श्रमानें बसविलेला संवाद त्यानें ऐकावा अशी तिची आत्यंतिक इच्छा. पण तो आलाच नाहीं. ती हिरमुसली झाली. तिनें शिकविलेला तो

संवाद संपतांच लोकांनीं टाळ्या वाजवून वाहवा केली, तेव्हां तिचें हृदय जरी पुलकित झालं तरी तो त्या आनंदाचा वाटेकरी नव्हता, हें शल्य तिला असह्य झालं. लोकांनीं केलेल्या स्तुतीच्या सुखसंवेदनांपेक्षां तो न आल्यामुळें तिच्या मनाला वेदनाच अधिक जाणवल्या.

' कसला बाई स्वभाव तरी ! कांहीं हौसच नाहीं ! आले असतील कोणी तरी, करीत बसले असतील गप्पा झालं ! '

या विचारानें मनांत ती थोडीशी चिडली. अर्धा अधिक कार्यक्रम आटपल्यावर तिला वाटलें, ' प्रकृति तर एकाएकीं नादुरुस्त झाली नसेल ना ?' हा विचार मनांत येतांच ती अस्वस्थ झाली. संधि साधून ती चटकन बाहेर गेली. तेथें पट्टेवाले, शिपाई, ड्रायव्हर, गाडीवाले, गडी इत्यादि मंडळी दुरून दिसेल तें पहात व ऐकत बसली होती. मधुकररावांच्या ड्रायव्हरला तिनें खुणेनें जवळ बोलावून चौकशी केली. तो म्हणाला,

' होय, आजाऱ्यासारखे दिसत होते खरे. फार कांहीं नाहीं; पण डोकंबिकं दुखत असावं. '

तिची अस्वस्थता जास्तीच वाढली. कार्यक्रम पार पडेतोंपर्यंत तिच्या जिवाला हुरहूर लागून राहिली होती. अध्यक्ष गेल्याबरोबर तीहि तडक निघाली. दारांतच तिला गडी भेटला, त्यानें रिपोर्ट केला,

' साहेब जेवले नाहींत. सैंपाक्याला जायला सांगून उपाशींच निजलेत. '

ती त्याच्या खोलींत गेली, तों भिंतीकडे तोंड करून तो कॉटवर झोंपला होता. तिनें मस्तकावर हात टेवून पाहिलें तों तें फारसें गरम नव्हतें; पण कानशिलाच्या शिरा ताडताड उडत होत्या. ती म्हणाली,

' डोकं दुखतंय का ? '

' नाहीं. '

' मग काय होतंय ? बरं वाटत नाहीं ? '

' कोणीं सांगितलं बरं वाटत नाहीं म्हणून ? बरं आहे. ठीक आहे ! '

' म्हणजे ? '

ती आश्चर्यानें म्हणाली—

‘ म्हणजे, झोंपेंत का बोलायचं ? बरं वाटतं, मग आलांत नाहीं ते ? ’

‘ नाहीं आलों ! आम्ही कुठं रसिक आहोंत इतके—’

‘ चला, कांहींतरीच बोलायचं. किती छान संधि आपण उगाच दवडली ! मास्टर मोडकाची नक्कल तर किती तरी छान झाली ! भिकाऱ्याचा अभिनय झाला तेव्हां तर दीड दोन मिनिटें सारख्या टाळ्या पडत होत्या ! खरंच गडे, आपण कां नाहीं आलांत ? ’

‘ सांगितलं ना, मी रसिक नाहीं म्हणून ? तूं पाहिलंस म्हणजे झालं ! ’

त्याला वाटलें, आपल्याला शब्दांत पुरेसें काठिण्य आणतां येत नाहीं. तिला वाटलें, आपण फार वेळ बाहेर राहिल्यामुळें त्रासून तो फार कठोरपणें बोलत आहे, याकरितां आपणच नमतें घेतलें पाहिजे. ती म्हणाली,

‘ बरं, चला. जेवायचं ना ? ’

‘ अं हं. ’

तिनें पुष्कळच आग्रह केला, शेवटीं स्वतःहि उपाशीं रहाण्याची तयारी दाखविली तेव्हां त्यानें थोडेंसें खाल्लें. त्याच्या मनांत विकार-विचारांचें द्वंद्व सुरू होतें. ‘ आपण ऐकतों तें खरें कीं पहातों तें खरें ’ त्याला निर्णय करतां येईना. भलत्याच विचारांना उच्चाराचें स्वरूप येऊं नये म्हणून त्यानें डोळे मिटून स्तब्ध रहाण्याचें ठरविलें. तिला वाटलें, त्याला झोंप लागली.

× × ×

दोन दिवस ती त्या गणेशोत्सवाच्या स्त्रियांच्या कार्यक्रमांत गुंतली होती आणि तोहि आपल्या उद्योगांत गढला होता. फरक इतकाच कीं, तिला आपल्या कामांत उत्साह, आनंद वाटत होता. आणि तो मात्र दुःखानें खचत होता, कुढत होता, चिडत होता. आणि जेव्हां उत्सवाची दगदग संपली तेव्हां तिनें मुक्ततेचा श्वास घेतला. तिला आतां हलकें हलकें वाटूं लागलें. पण तिच्या उलट त्याचें हृदय मात्र दुःखानें जड झालें होतें. आतां पतीकडे पुष्कळ लक्ष देऊन, चार दिवस झालेल्या हयगयीची भरपाई करावयाची

असं तिनें मनाशीं ठरविलें. एकसारखे इकडचे तिकडचे कार्यक्रम असल्यामुळें आपणास दिवसाचे बरेच तास घालवावे लागले होते. सोईगैरसोईकडे दुर्लक्ष्य करावें लागलें होतें. त्या साऱ्याची आतां भरपाई करायची. तरी सुमाताईकडचं आग्रहाचं आमंत्रण असतां, तिच्या कॉलेजच्या फंक्शनच्या एकहि प्रयोगाला जातां आलं नाहीं त्यामुळं तीसुद्धां रागावली असेल. पण आधीं हा घरचा रुसवा काढला पाहिजे ! संध्याकाळीं आल्यावर एखाद्या 'शो' लाच जायचं बरोबर, म्हणजे ठीक होईल सारं !

मनोहर घरीं येतांच तिनें आपला बेत बोलून दाखविला. तिच्या स्वरांत लाडकेपणा होता. आनंदी पांखरानें सूर्योदय झालासें पाहून किलबिल करावें, त्याप्रमाणें भावनेच्या आवेगानें लाडक्या लाडक्या शब्दांत तिनं आपल्या बेताची हंसत हंसत प्रस्तावना केली. हंसतांना कुंदकळ्यांसारखे तिचे सुंदर शुभ्र दांत हास्याच्या प्रमाणांत कमीअधिक दृश्यमान होऊन तिच्या मुखमंडलाची शोभा वाढवीत होते. परंतु नेहमींप्रमाणें आज त्या शोभेचा सत्कार झाला नाहीं. उन्हाच्या झळीनें फूल कोमेजावें तशी तिची स्थिति झाली.

उपरोधिक हास्य करीत तीव्र स्वरानें मनोहर म्हणाला,

'कां ? बरोबर यायला आज कोणी मित्र नाहींत वाटतं ?'

त्याच्या डोळ्यांत विलक्षण चमक होती. ती पाहून तिला कसेंसेंच वाटलें. भयचकित दृष्टीनें त्याच्याकडे पहात ती म्हणाली,

'म्हणजे ?'

'म्हणजे ? म्हणजे नाहीं समजलं ? मी म्हणतों कीं, नेहमींप्रमाणें कोणी मित्र, सहकारी, समव्यवसायी इत्यादि प्राण्यांपैकीं आज कोणी सोबतीला नाहींत का ? आज माझीशी आठवण झाली ?' त्याच्या डोळ्यांत त्वेष तळपत आहे असें तिला वाटलें. ती गोंधळून म्हणाली,

'पुरे झालं हं, असली थट्टा मला आवडायची नाहीं.'

'पण कोण करतोय थट्टा ?'

' मग मी लोकांबरोबर – इकडे न कळवतां – नाटक – सिनेमाला जातें असाच ना बोलाण्याचा अर्थ ? '

' अर्थात्. डोळ्यांनीं पाहिल्यावर शंका कसली ? '

' डोळ्यांनीं पाहिलं ? कुणीं ? आपण ? '

तिला हंसू येत होतें. पण त्याच्या रागाच्या बोलण्यामुळें त्यास आळा बसला. तो चढया स्वरानें म्हणाला,

' हो हो, तें पातळ नेसून तूं त्या मधुकरांबरोबर परवां पाहिल्या 'शो'ला नव्हती गेलीस ? अन् तो शेला पांघरून कित्येकदां तूं तुझ्या सहकाऱ्याबरोबर नाहीं फिरलीस ? '

या अनपेक्षित भडिमारानें क्षणभर ती स्तिमित झाली. भयचकित दृष्टीनें ती त्याच्याकडे पाहूं लागली. गोंधळल्यामुळें काय बोलावें हें तिला सुचेना. कांहीं आठवल्यासारखें वाटून ती उठली आणि आपल्या खोलीपर्यंत जाऊन परत येऊन बसली. नंतर निश्चयी मुद्रेनें त्याच्याकडे पहात शान्तपणें म्हणाली,

' होय, गेलें होतें! तें पातळ नेसून अन् तो शेला पांघरून मी गेलें होतें ! मग काय म्हणणं आपलं ? तें सारं माझ्यासाठीं आणलं आहे कीं दुसऱ्या कुणासाठीं ? मी नेसावं वापरावं म्हणूनच ना आणलं होतं ? मग नेसलें म्हणून काय झालं ? '

तो ताडकन् उठला आणि डाव्या तळहातावर उजवी मूठ आपटून त्वेषानें म्हणाला,

' काय झालं ? असं विचारायला लाज नाहीं वाटत तुला ? काय झालं असं उलट विचारतेस ? मी म्हणतों, काय व्हायचं राहिलं ? नुसतं घरांत नेसायला सांगितलं तर काय शालीनतेचा आव आणला अन् केवढं प्रवचन झोडलं ! आतां तींच वस्त्रं नेसून बेधडक दुसऱ्याबरोबर बाहेर मिरवतेस; अन् काय झालं म्हणून वर मला विचारतेस ! हा निर्लज्जपणा तुझा तुलाच शोभतो ! '

चढया आवाजानें तो बोलत होता. त्याचे डोळे चकाकत होते, ओठ

थरथरत होते, आणि हातच नव्हे, सर्व शरीर रागानें कांपत होतें. छाती जोरानें धडधडत होती. तो मटकन खुर्चीत बसला. त्याचें आजच्यासारखें स्वरूप तिनें यापूर्वी कधींच पाहिलें नव्हतें. सुरवातीला त्याच्या बोलण्याची तिला मौज वाटली होती, नंतर थट्टा वाटली, मग भीति वाटूं लागली, आणि शेवटीं अग्निवर्षावांत सांपडल्यासारखें दाहक पण अनिर्वचनीय दुःख तिला झालें. तिची जीभ सुकून टाळूला चिकटली. बसल्याजागीं तिची शक्ति नाहींशी झाली. थरथर कांपत ती उठली. असहायपणें हात पसरून तिनें भिंतीचा आधार घेतला, आणि समर्थनपर एकहि शब्द बोलल्याशिवाय आपला तोल सांवरीत कशीबशी धडपडत आपल्या खोलींत गेली. अश्रूंमुळें अंधुक झालेली आपली दृष्टि तिनें कपड्यांच्या कपाटाकडे वळविली. कांचेच्या तावदानांतून तें पातळ आणि रेशमाचें कागदांत गुंडाळलेलें पुडकें ठेवल्याजागीं तसेंच दिसत होतें.

ज्या वस्तूंमुळें तिच्यावर आज एवढा गहजब झाला, त्यांना स्पर्श करण्याची तिला तादृश इच्छा राहिली नव्हती. तिनें आपली दृष्टि त्यांवरून काढून घेतली आणि बिछान्यावर डोकें टेकून दुःखाला वाट मोकळी करून दिली. आजाऱ्याप्रमाणें ती पडून होती. पण नेहमींप्रमाणें तिजवर उपचार होत नव्हते. दुसऱ्या दिवशीं तिच्या तोंडावर विलक्षण फिक्कटपणा दिसूं लागला. एखाद्यानें पाहिलें असतें तर सहा महिने ती आजारी आहे असेंच त्यास वाटलें असतें. पण त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें.

* * *

दुसरे दिवशीं तो नोकरीवर आणि नोकरलोक घरीं गेल्यानंतर दबलेल्या दुःखाला पुन्हा अवसर मिळाला. कालच्या दिवसाची तिनें परवांपर्यंतच्या दिवसांच्या वागणुकीशीं तुलना करून पाहिली. असला दिवस यापूर्वी कधींच उजाडला नव्हता. मग असला भयंकर दिवस उजाडण्याचें प्रयोजन तरी काय ? तिनें पुष्कळ विचार केला. तिला कांहींच कल्पना करतां येईना.

' आपला पति किती प्रेमळ, किती सदय अन् विचारी. हेवा करण्याजोगं त्यांचं प्रेम ! तें न साहून कुणा दुष्टानं त्यांच्या मनांत कांहीं भलतंच भरवून तर दिलं नाहीं ना ? कीं दैवाचीच वक्रदृष्टि फिरली ? कल्पना करवत नाहीं अशा तऱ्हेनें काय हा चमत्कार घडला ?

' जें पातळ मी कधीं नेसलेंच नाहीं त्यानंतर, तें नेसून परक्याबरोबर फिरल्याचा मजवर आरोप ? मोठा चमत्कार आहे ! त्याचे ब्लाऊज करीन म्हटलं तेव्हां—

' आम्हीं प्रेमानं आणलं त्याचे तुकडे करणार ? ' असं नुसतं थट्टेनं म्हटलं, तर मीं तें न फाडण्याचा निश्चय करून प्रेमाचं प्रतीक म्हणून जपून ठेवलं !

' तुला नेसायचं नाहीं तर मला दे. ' असं परवा शुभाताई म्हणाली, तेव्हां ' तुझ्या लग्नांत आहेर करीन ' अशी कांहींतरी उडवाउडवीची सबब सांगून तें देण्याचं मीं टाळलं. इतकंच नव्हे तर तिच्या दृष्टीस पुनः न दिसतां माझ्या नजरेसमोर असावं म्हणूनच मीं तें पुडकं न उघडतां कांचेच्या कपाटांत ठेवून दिलं अन् आजहि तें तिथंच आहे. असं असतां हा वृथा आरोप कां ? '

अंग शहारल्यासारखें करून ती म्हणाली,

' बोलणं झालं तें खरंच, कां स्वप्न पडलं मला ! '

तिला कालचा सारा प्रकार आठवला आणि एकदम हुंदका आला. एका सुख-स्मृतीनें त्यांची संख्या वाढतच गेली. ती आपल्या दुःखांत चूर असल्या-मुळें बाहेर मनोहर आल्याची चाहूल तिला लागली नाहीं ! शिवाय नेहमीं-पेक्षां तो लौकरच आला होता. हलकेच तो पत्नीच्या खोलीपर्यंत गेला. दार लोटलेलें असून तिचे अस्पष्ट हुंदके व निश्वास ऐकू येत होते. प्रथम त्याच्या मनाला वाईट वाटलें; पण झटकन् तो तेथून परतला. जणूं काय अधिक थांबल्यास पायांवर ताबा न राहून ते आपणांस बळेंच वाहून नेतील, अशी त्यास भीति वाटली असावी. तो सावकाश आपल्या खोलींत शिरला, तों टेबलाशीं आपला गडी कांहींतरी कागदपत्रांची चाळवाचाळव करीत उभा आहे असें त्यास आढळून आलें. त्याच्या एका हातांत डस्टर होतें; पण तो

टेबल तर झटकीत नव्हता खास ! धन्याला पाहून त्याची कांहींशी चलबिचल झाली; पण लगेच त्यानें टेबल झटकण्यास सुरवात केली, तों एक कव्हर त्याच्या हातून खालीं पडलें.

' काय आहे रे तें ? '

तो अडखळत अडखळत कांहीं सबबी सांगून खुलासा करीत होता; पण तिकडे लक्ष न देता त्यानें तें पाकीट त्याच्या हातांतून खसकन् ओढूनच घेतलें. वर सुमित्रेचें नांव होतें. भुकेलल्या पशूनें भक्ष्यावर झडप घालावी, त्याचप्रमाणें त्यानें त्या पत्रावर झडप घालून तें फोडलं, आणि वाचूं लागला–

' प्रिय सुमाताईस नमस्कार वि. वि.

' आमच्या कॉलेजचें गॅदरिंग आहे हें तुला ठाऊकच आहे. तूं–म्हणजे तुम्ही–जरूर आलें पाहिजे बरें का. मी चांदबिबींचें काम करणार आहे. चांदबिबीचीं वस्त्रें कशीं चंद्रावरील ढगांप्रमाणें झिरझिरीत असतात, हें चित्रावरून आपणांस माहीतच आहे. मला माझी भूमिका त्या काळाला धरून सजवायची आहे. या कामीं तुझा शेला माझ्या चांगला उपयोगीं पडेल, म्हणून मागायला आलें होतें–तों तूं किंवा भाऊजी कोणीच घरीं नव्हतां. शेल्याचें पुडकें मात्र कांचेच्या कपाटांतून दिसत होतें; पण घेतां येत नव्हतें. मी सहज कपाटाचें हॅन्डल ओढून पाहिलें तर तें उघडेंच असल्यामुळें उघडलें गेलें. मीं शेला घेतला अन् तुझें तें अभिनव पातळहि घेतलं. नाहींतरी तुझ्याकडे तें पडूनच रहाणार; त्यापेक्षां आजकाल मला त्याचाहि फार उपयोग होणार आहे. तूं म्हणाली होतीस त्याचे ब्लाऊझ, चोळ्या वगैरे कराव्या. पण अशा सुंदर पातळाचे तुकडे करण्याची कल्पना मला न आवडल्यामुळें तुझ्या परवानगीशिवाय तें वापरायचें ठरवून मी नेत आहें. तुला अडचण पडूं नये म्हणून तूर्त त्याच्या बदली माझें स्वस्तिक कांठाचें जरीचें लुगडें तुझ्यासाठीं ठेवलें आहे, काम झाल्यावर शेला परत करीन. पण लौकरच होणाऱ्या आमच्या लग्नाचा आहेर म्हणून परत घेणार असशील तर तो

तुझा प्रश्न आहे ! आमच्या लग्नाचें नक्की ठरलें ! मधुकरांच्या मागणील बाबांनी कालच संमति दिली !

तुझी– शुभावती '

पत्नींचें कांहींतरी पाप तिच्या पदरांत घालण्यासारखा पुरावा पत्रांत आढळेल अशी त्याची अपेक्षा होती, पण आपलेच दांत आपल्या घशांत जाण्याची पाळी आली असें त्यास आढळलें; तरी त्याचा चेहरा खुलला ! छातीवरचं मोठें दडपण दूर झालें असें त्यास वाटलें. त्यानें पत्राच्यावर नजर टाकली तं त्यावर दोन आठवड्यांपूर्वीची तारीख ! त्यानें लगेच गड्याला हांक मारू चौकशी केली तेव्हां तो त्याच दिवशीं तें पत्र देण्यास विसरला व आज जेव्ह दुसरी चिठ्ठी आली तेव्हां ती टेबलावर व जुनें पत्र टेबलावरील कागदांखाल ठेवण्याच्या बेतांत होता, हें सत्य निष्पन्न झालें. दुसरी चिठ्ठी अशी होती:—

' ... अद्यापि फोटो काढायचा असल्यामुळें शेला परत केला नाहीं. तुझं पातळ मात्र माझ्या सर्व मैत्रिणींना व मधुकरांनाहि फार आवडलें. एकद आम्ही सिनेमाला गेलों असतां काय गंमत झाली ती मी तुला समक्षच सांगेन एका मनुष्यानें मला आपली ' वहिनी ' म्हणूनच हांक मारली ! मधुकरांनं त्याची चांगलीच काढली असती; पण भाऊजींच्या हातांत हात घालून सिनेमा थिएटरांत येतांना मी त्याला पाहिलें होतें, म्हणून मी त्यांना थांबविलें. असो. तूं– नव्हे तुम्ही– आलां नाहींत आमच्या गॅदरिंगला म्हणून मी रागावलें आहे. अन् तूर्त कामांतही आहें ! विशेष भेटीअंतीं.

तुझी– शुभा '

गड्याच्या हलगर्जीपणाबद्दल त्याला दोष द्यायलाहि तो थांबला नाहीं. तडक पत्नीच्या खोलींत गेला आणि कपड्यांचें कपाट उघडून त्यानें तें पुडकें बाहेर काढून उलगडलें– तों त्यांतून स्वस्तिक कांठाचें जरीचें लुगडें बाहेर पडलें !

बिचारी सुमित्रा ! नवऱ्याच्या आविर्भावानें घाबरून गेली. तिनें आपला निस्तेज चेहरा कापऱ्या हातांनीं झांकून घेतला. तिची छाती धडधडत होती.